


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त-मंडळाचें मासिक

वर्ष तिसरें
अंक सातवा

# नवभारत

एप्रिल
१९५०

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर-आचार्य स. ज. भागवत - श्री. हरि कृष्ण मोहनी - प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त-मंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.






# ' नवभारत ', एप्रिल १९५०

## लेखक-परिचय

[ या अंकांतील खालील लेखकांशिवाय बाकीच्या लेखकांपैकीं कांहींचा परिचय त्यांच्या लेखांच्या प्रारंभीं तळटीपेंत दिला आहे; इतरांचे लेख ' नवभारतां 'त या वर्षीं यापूर्वी आले असून त्या त्या वेळीं त्यांचा परिचय दिला आहे.—का. सं. ]

**आचार्य काकासाहेब कालेलकर, ( वर्धा )**— सुप्रसिद्ध गांधीवादी तत्त्वचिंतक आणि कार्यकर्ते. गुजराती व मराठी वाङ्मयांतील उच्च श्रेणीचे प्रथितयश साहित्यिक. २६ जानेवारीपासून यांच्या संपादकत्वाखालीं 'हिंदुस्थानी प्रचारसभा, वर्धा'तर्फे ' मंगल प्रभात ' हें मासिक सुरू झालें आहे.

**प्रा. प. वि. पटवर्धन**— पुणें येथील 'नौरोसजी वाडिआ कॉलेज'मध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

**प्रा. ना. वा. कोगेकर**— मुलुंद येथील ' टोपीवाला कॉलेज ' मध्यें पदार्थविज्ञानशास्त्राचे प्राध्यापक.

**प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर**— पुणें येथील ' डेक्कन कॉलेज पोस्टग्रॅज्युएट ॲन्ड रिसर्च इन्स्टिट्यूट' या संस्थेंत ' मराठा इतिहासा'चे प्राध्यापक. ' Panipat : 1761 ' या ग्रंथाचे कर्ते.

**श्री. शांता ज. शेळके** एम्. ए., मुंबई— ' कोजागरी ', 'मुक्ता', 'वर्षा' इत्यादि पुस्तकांच्या लेखिका.

**प्रा. श्रीकृष्ण के. क्षीरसागर**—पुणें येथील 'महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटी'च्या कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक. ' व्यक्ति आणि वाङ्मय ', ' सुवर्णतुला', 'राक्षसविवाह' इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

**प्रा. नलिनी पंडित**— मुंबई (माटुंगा)च्या ' पोद्दार कॉलेज ऑफ कामर्स ' मध्यें अर्थशास्त्राच्या प्राध्यापिका.

---

**चुकीची दुरुस्ती :**

' नवभारता'च्या मार्च १९५० च्या अंकांतील ' लेखकपरिचया'मध्यें विंदा करंदीकर ( प्रा. गो. वि. करंदीकर ) हे मराठीचे प्राध्यापक अशी चुकीची माहिती दिली होती. प्रा. गो. वि. करंदीकर हे रत्नागिरी येथील ' गोगटे कॉलेज ' मध्यें, मराठीचे नव्हे, इंग्रजीचे प्राध्यापक आहेत.

—का. सं.



अनुक्रमणिका

आचार्य काका कालेलकर

# स्त्रियांचे कैवारी व जीवनगुरु बापूजी

आश्रम-जीवनाची[1] चर्चा करतांना मीं पूज्य बापूजींना एकदा म्हटलें होतें कीं,

"आश्रमांत जेवढे पुरुष आले आहेत ते सर्व आपल्या प्रवृत्तीमुळें आकर्षित होऊन आलेले आहेत. राष्ट्रसेवा हें तर सर्वांचें ध्येय आहेच; परंतु त्यांतील कित्येकांच्या आकर्षणाचें कारण राजकीय स्वराज्यप्राप्ति हें आहे. कित्येक हिंदुधर्माची पुनर्जागृति आपल्या मार्फत होईल असें पाहून आले आहेत. कित्येक आपल्या द्वारा अहिंसा जिवंत व प्रभावी होऊं लागली आहे एवढ्यामुळें आकर्षित झालेले आहेत; कित्येकांच्या आकर्षणाचें अस्पृश्यता निवारण हेंच मुख्य कारण आहे; आणि आमच्यापैकीं कित्येक राष्ट्रीय शिक्षणाचा प्रयोग करण्यास हें एक उत्तम स्थान आहे अशा समजुतीनें आले आहेत; परंतु आश्रमांतील स्त्रिया या कांहीं आश्रमाचा आदर्श समजून घेऊन आल्या आहेत असें म्हणतां येणार नाहीं. गंगाबहेनसारख्या एखाददुसऱ्या भगिनींचा अपवाद वगळल्यास बाकीच्या सर्व स्त्रिया आपले पति, पिता किंवा बंधु अशाच कोणाच्या तरी मागोमाग आलेल्या आहेत. आश्रमजीवनाचा त्यांना बळेंच स्वीकार करावा लागलेला आहे ही गोष्ट उघडच आहे. कित्येक स्त्रियांच्या मनांत आश्रमाच्या आदर्शाविषयीं विरोध नसला तरी अप्रीति खास आहे. ब्रह्मचर्याच्या आदर्शाचीच गोष्ट मी सांगत नाहीं. परंतु कौटुंबिक जीवनाला गौण स्थान देऊन आम्ही सामाजिक जीवन अंगवळणीं पाडूं इच्छितों हें कित्येकांना पसंत पडत नाहीं. आपले आहाराविषयींचे नियम देखील स्त्रियांना जाचक वाटतात.

"दुसरी गोष्ट अशी कीं, रोज थोडी थोडी चर्चा करून स्त्रियांना सर्व समजावून सांगण्याचा धीर देखील पुरुषांच्या अंगीं कमी आहे. कसें तरी करून निभावून घेणें असलेंच वातावरण बहुधा दृष्टीस पडतें. त्यामुळें स्त्रीवर्ग आश्रमजीवनाला परिपुष्ट करण्याच्या ऐवजीं शिथिल करण्यासाठीं धडपडत आहे असें वाटतें. आणि अशा रीतीनें आपला बोजा वाढत जात आहे. याचा उपाय केवळ आपणच करूं शकाल."

यावर पुष्कळ चर्चा झाली आणि बापूजींनीच स्त्रियांचा एक स्वतंत्र वर्ग चालवावा असें ठरलें. बापूजींनीं यांत एक महत्त्वाची भर टाकली. त्यांनीं स्त्रियांसाठीं एक स्वतंत्र प्रार्थना सुरू केली. प्रार्थनेंतील सर्व श्लोकांची स्वतःच निवड केली आणि स्त्रियांच्या वर्गासाठीं वेळ काढून त्यांत पूर्णपणें मन घातलें.

---

१ 'नवजीवन प्रकाशन मंदिर, अमदाबाद' तर्फे—"बापूजींचीं पत्रें–१ आश्रमांतील स्त्रियांस" हें पुस्तक लवकरच प्रसिद्ध होणार आहे. या पुस्तकास आचार्य काकासाहेब कालेलकर यांची प्रस्तावना आहे. हें पुस्तक व प्रस्तावना मूळ गुजरातीचा अनुवाद असून तो 'नवजीवन' मधील श्री. पां. ग. देशपांडे यांनीं केला आहे. या आगामी प्रकाशनांतील आचार्य कालेलकरांच्या प्रस्तावनेंतून वरील भाग उद्धृत केला आहे. —का. सं.

या सवाचा अद्‌भुत परिणाम झाला. स्त्रियांमध्यें एक नवीन जागृति आली, त्यांच्या प्रश्नाची चर्चा होऊं लागली. आश्रमवासियांना त्यांच्या अडचणींची जास्त स्पष्ट जाणीव होऊं लागली, अनेक विशिष्ट प्रकारचे वर्ग सुरूं झाले, आणि नाना प्रकारचे प्रश्न उलगडण्यासाठीं पुढें आले. त्यानंतर पूज्य बापूजींनीं जवळ जवळ क्षेत्रसंन्यास घेऊन आश्रमांतच एक वर्ष राहण्याचा निश्चय केला. अनेक प्रवचनें दिलीं. वर्ष पुरें झाल्यावर बापूजींनीं दक्षिण भारताचा प्रवास सुरूं केला. गुजरातमधील अतिवर्षणाचे ते दिवस होते. त्यानंतर मद्रासची काँग्रेस भरली. बापूजी काँग्रेसच्या राजकारणांतून निवृत्त झाले होते. तेव्हां त्यांनीं राजगोपालाचारी यांना खादीच्या कार्यांत मदत करण्यासाठीं दक्षिण भारतांत प्रवास केला. त्याच कार्यासाठीं त्यांनीं लंकेचा म्हणजे सिलोनचाहि प्रवास केला; ओरिसाकडेहि ते गेले. गौहाटी काँग्रेसनंतर त्यांनीं पुनः राजकारणांत प्रवेश केला व स्वराज्यपक्षाला सल्ला वगैरे देण्याची जबाबदारी पत्करली.

इ. स. १९२७–२८ व–२९–हीं तीन वर्षें बापूजींनीं आश्रमांतील स्त्रियांना पत्रें लिहून तेथील स्त्रीमंडळाचें, स्वतः निर्माण करून दृढ केलेलें वातावरण जिवंत ठेवण्याचा प्रयत्न केला. स्त्रियांपुढें एखाद्या रचनात्मक प्रवृत्तीची सूचना ते मांडित. स्त्रियांनीं ती स्वीकारली तर त्यांना ते प्रोत्साहन देत. त्या घाबरल्या किंवा साशंक झाल्या तर ताबडतोब ते आपली सूचना मागें घेऊन किंवा सौम्य करून त्यांना अभयदान देत आणि त्या सूचनेला किंवा विचाराला वेगळ्या तऱ्हेनें वळण देऊन पुनः ते त्यांच्या समोर जास्त परिणामकारक रीतीनें मांडीत. आपल्या प्रवासांत स्त्रीजागृतीचीं जीं जीं उदाहरणें त्यांच्या दृष्टीस पडत त्यांविषयीं आश्रमांतील स्त्रियांना लिहून त्यांना ते प्रोत्साहन देत. अशा तऱ्हेनें अनेक प्रकारें प्रयत्न करून बापूजींनीं आश्रमांत स्त्रीजागृतीचें वातावरण चांगलें जमवलें. त्याचीं मधुर फळेंहि लवकरच पाहावयास मिळालीं.

गांधीजींनीं दांडीकूच सुरू केली तेव्हां आश्रमांतील पुष्कळ पुरुष–प्रौढ व तरुण–त्यांच्या तुकडींत सामील झाले आणि आश्रमांतील सर्व कामें चालवण्याची जबाबदारी आश्रमांतील स्त्रियांनीं आपल्या डोक्यावर घेतली.

आश्रमाच्या बाहेरील स्त्रियांनीं देखील त्या दिवसांत कमालीचें काम करून दाखविलें. त्यांतल्या त्यांत दारू-निषेधासाठीं गुत्त्यांवर पहारा करण्याचें काम, गुत्तेदारांचीं मनें वळविण्याचें काम आणि दारू पिणाऱ्या लोकांच्या घरीं जाऊन स्त्री-पुरुषांना दारू बंद करण्याच्या कामीं कंबर कसण्यास प्रेरणा देण्याचें काम स्त्रियांनीं मोठें अपूर्व केलें. त्या दिवसांतील देशजागृतीचें आणि त्यांतहि विशेषतः स्त्रीजागृतीचें स्मरण झालें म्हणजे आजदेखील मन आश्चर्यचकित होतें व ' खरोखर, तो भारलेला जमाना होता ' असे उद्‌गार बाहेर पडतात. त्या दिवसांत माणसानें स्वतःच्या शक्तीपेक्षांहि जणूं जास्त काम करून दाखवलें होतें याविषयीं शंका नाहीं.

बापूजींच्या पत्रांत तीन गोष्टींबाबत त्यांचा सतत आग्रह दिसून येतो :

( १ ) सामाजिक जीवनाचें महत्त्व स्त्रियांच्या मनावर ठसविणें आणि हें सामाजिक जीवन जागृत होऊन दृढ व्हावें म्हणून त्यासाठीं निरनिराळे उपाय योजणें.

( २ ) ' शिक्षण म्हणजे अक्षरज्ञान ' ही भ्रामक समजूत मोडून काढून ' शिक्षण म्हणजे चारित्र्याची घडण व जीवनासाठीं आवश्यक अशी कार्यकुशलता ' हा नवीन विचार सर्व लोकांना पटवून देणें.

( ३ ) आपण समाजावर आणि त्यांतूनहि दबलेल्या वर्गांवर भाररूप होऊं नये; आणि आपल्या जीवनांत या ना त्या मार्गानें पापाचा शिरकाव होऊं नये एवढ्यासाठीं शरीरश्रम, उद्योगपरायणता, साधेपणा आणि संयमाविषयीं निष्ठा अंगीं बाणवून तसें वातावरण दृढ करणें.

या तीन आग्रहांच्या बरोबरच, तंबोऱ्याच्या सुराप्रमाणें, स्त्रीस्वातंत्र्याची गोष्ट या पत्रांतून सतत येतच असते. स्त्री ही खरोखर अबला नाहीं; पुरुषाची आश्रित होण्याचें तिला कांहीं कारण नाहीं; समाजाचें नेतृत्व पुरुषांच्या हातीं असावें हा देखील कांहीं सनातन नियम नाहीं; स्त्रीला आपलें जीवन स्वतःच्या इच्छेप्रमाणें घडवता व कमावता येईल व असें करूनच मानवप्रगतींत

# स्त्रियांचे कैवारी व जीवनगुरु बापूजी

स्वतःची म्हणून भर टाकता येईल—अशा प्रकारची शिकवण स्त्रियांच्या शक्त्यनुसार बापूजी अगदीं न कंटाळतां त्यांना सतत देतच असतात.

आश्रमांत कधीं कधीं चोर येत या प्रसंगाचा उपयोग करून चोर आले म्हणजे स्त्रियांनीं काय करावें हा प्रश्न त्यांनीं छेडला. आश्रमांत मुळीं पुरुष नसलेच तर स्त्रियांनीं स्वतःचें संरक्षण करावें कीं नाहीं ?

या चर्चेच्या वेळीं स्त्रियांनीं बापूजींना लिहिलेलीं पत्रें आज आपल्यापाशीं असतीं, तर तीं एक महत्त्वाची सामग्री ठरली असती. आज बापूजींच्या उत्तरांवरून स्त्रियांच्या पत्रांत काय असेल याची केवळ कल्पनाच करतां येते.

पुरुषानें स्त्रीजातीला पराधीन बनवलें ! स्वतःच्या भोगलालसेला प्राधान्य देऊन त्यानें स्त्रियांचें जीवन एकांगी, पराधीन, आणि कृत्रिम करून सोडलें. पुरुषाची असूया व स्वामित्व यांमुळेंच स्त्रीजात अबला, असहाय व अनाथ गणली गेली आहे. हें सर्व ध्यानांत घेतां स्त्रीरक्षणाची अंतिम जबाबदारी पुरुषांचीच होय; आणि आश्रमांत एकदेखील पुरुष असेतोंपर्यंत स्त्रीचें रक्षण करीत करीत त्यानें आपला देह अर्पण करणें हा त्याचा धर्म आहे ही गोष्ट मान्य करूनहि बापूजी म्हणतात कीं, 'आज जरी तुम्हांला आपलें संरक्षण स्वतः व स्वतःच्या पद्धतीनें करतां येत नसेल तर नसो; परंतु ही शक्ति तुम्ही हळूंहळूं कमावलीच पाहिजे.'

पांढरपेशे लोक व श्रमजीवी वर्ग यांच्यामध्यें जो भेद आहे तो फक्त शिकलेल्या लोकांतच आहे किंवा पुरुषवर्गांतच आहे असें नाहीं. तो भेद स्त्रियांत देखील तितकाच खोल मूळ धरून बसलेला आहे, हें जाणून बापूजी या पत्रांतून आश्रमांतील स्त्रियांस मजुरी करणाऱ्या स्त्रियांच्या बरोबर कौटुंबिक भावनेनें बांधले जाण्यास सांगतात.

आश्रमांतील स्त्रियांत कित्येक अगदीं मुग्ध बालिकांसारख्या होत्या तर कित्येक अशिक्षित व वृद्ध होत्या; कित्येक अनुभवी तर कित्येक बिन-अनुभवी होत्या; कित्येक शहरी वातावरणांतून आलेल्या, तर कित्येक खेड्यांतून सरळ आश्रमांत येऊन पोहोंचल्या होत्या; आणि या सर्व एकाच प्रांतांतील होत्या असेंहि नाहीं. इतकी विविधता जेथें असते तेथें कोणती सूचना करावयाची झाल्यास अगोदर दहा वेळ विचार करावयास हवा; त्यामुळें या पत्रांतून गांधीजींनीं फारच सावधगिरीनें आपल्या सूचना केलेल्या आहेत, असें दिसून येतें. स्वतःला पटेल, जेवढें सर्वानुमतें करण्याचें नक्की होईल, तेवढेंच करा, बाकीचें सोडून द्या— हें अभयदान पदोपदीं त्यांनीं दिलेलें आहे.

त्यांनीं सुरुवात केली आहे समयपालनाच्या आग्रहापासून. प्रार्थनेला यावयाचेंच आहे तर तें वेळेवर आलें पाहिजे. संस्कृतांत 'समय' शब्दाचे दोन अर्थ होतात: एक होतो 'वेळ' व दुसरा 'वचन किंवा करार'; या दोन्ही अर्थांनीं 'समयः परिपाल्यताम्' हीं बापूंची पहिली शिकवण आहे. प्रार्थनेंत वेळेवर आल्यावर प्रार्थनेंत एकाग्र होणें, तेथें प्रार्थनेचे श्लोक व गीतेचे अध्याय तोंडपाठ करणें, उच्चाराकडे खास लक्ष देणें या सर्व गोष्टी हळूंहळूं येतात. प्रार्थनेंत जाण्याचें नक्की केल्या-नंतर असामान्य अडचणीखेरीज जाण्याचें टाळतां कामा नये. जें अंगावर घेतलें त्याचें पालन झालेंच पाहिजे. प्रार्थना हें अंतःकरणाचें स्नान आहे. रोज जसें स्नान करण्यास आपण चुकत नाहीं तसें अंतःकरणाला विशुद्ध करणारी प्रार्थना आपण चुकवतां कामा नये.

प्राचीन काळीं धर्मनिष्ठा म्हणजे देवदर्शनासाठीं मंदिरांत जाणें असा अर्थ होत असे. आजच्या काळीं प्रभु रामचंद्रानें चरख्याचें रूप धारण केलें आहे. या रामस्वरूप चरख्याला सोडतां कामा नये. यज्ञ म्हणजे परमार्थाप्रत्यिर्थ करावयाचें काम; म्हणून चरखा चालवलाच पाहिजे. आजच्या कलियुगांत 'वसनरूप भये श्याम' हें आपण विसरतां कामा नये. त्यागानेंच जविन उन्नत होतें. पण उगीचच्या उगीच त्याग होत नसतो. सेवेप्रीत्यर्थ, परोपकाराप्रत्यिर्थ त्याग करणें सोपें जातें. एवढ्यासाठींच सूत्रयज्ञाचा आग्रह बाळगण्यांत आलेला आहे. रहाट नियमितपणें चालवला पाहिजे. नियमितपणें केलेलें काम पचनीं पडतें. एकाच वेळीं पुष्कळ करूं गेल्यास त्या कर्मामुळें

आत्मा दुखावतो. प्रार्थना आणि सूतरहाट ही सामुदायिक कृति जर आपण केली तर तिच्यामुळें त्या दोन्ही वस्तूंचा एकमेकांशीं आणि सर्वांचा परमेश्वराशीं सहकार साधला जातो.

असें सांगून गांधीजींनीं स्त्रियांमध्यें कौटुंबिक भावनेपेक्षां व्यापक अशी सामाजिक भावना निर्माण व दृढ करण्याचा प्रयत्न केला आहे. आणि त्यासाठीं आंतून मानसिक विकास साधण्याची व बाहेरून स्वतःपैकीं एकीला पुढारीण नेमून तिला सर्वांची सेवा करण्याच्या कामीं मदत करण्याची सूचना स्त्रियांच्या पुढें मांडली आहे. " स्त्रियांमध्यें एकमेकींशीं सहयोग अत्यंत आवश्यक आहे. समग्र आश्रमाला स्वतःचें कुटुंब समजा आणि त्याच्या द्वारां विश्व-कुटुंबभावनेची तयारी करा. आज स्त्री-सेविकांची विशेष आवश्यकता आहे, कारण स्वराज्याची किल्ली स्त्रियांच्या हातीं आहे. तुम्हीं कार्यकुशल होऊन, पवित्र जीवन व्यतीत करून समस्त भारत-वर्षांत जागोजागीं जा. स्त्री म्हणजे भीरु व अबलाच असावयाची अशी जी लोकांची समजूत आहे ती खोटी ठरवा. सभांतून एकत्र व्हाल तेव्हां फार चर्चा करूं नका. भांडणतंट्याचा अगदीं नायनाट केला पाहिजे. आपण एकत्र जमतों ते एकमेकांचीं अंतःकरणें जिंकण्यासाठीं जमत असतों." या सर्व महत्त्वाच्या गोष्टी समजावून सांगितल्यानंतर गांधीजींनीं हळूहळू आश्रमांतलि सार्वजनिक पाकशालेचें काम स्त्रियांवर सोंपविलें; कारण तें स्त्रियांचें परिचित क्षेत्र होय.

पाकशालेच्या बरोबर कोठार साहजिकपणेंच आलें. कोठार सांभाळावयाचें म्हणजे जमाखर्चाची बाब आलीच; तेव्हां त्याचें ज्ञान मिळवल्याखेरीज सुटकाच नाहीं. येथपर्यंत आल्यानंतर बालमंदिराचें काम स्त्रियांवर सोंपवण्याची योजना व तजवीज बापूजींनीं केली.

स्त्रियांच्या शिक्षणाच्या बाबतींत बापूजींनीं फारच सोपा कार्यक्रम त्यांच्या पुढें मांडलेला आहे. लिहिण्यावाचण्याचा सराव ठेवा, अक्षर सुधारा, उच्चार शुद्ध करा. जमाखर्च लिहिणें म्हणजे कांहीं अवघड गोष्ट नाहीं; त्यासाठीं बेरीज वजा-बाकी, गुणाकार व भागाकार एवढें गणित आलें म्हणजे पुरें.

यानंतर उद्योगमंदिराचें शिक्षण येतें. या शिक्षणांत अनेक गोष्टींचा समावेश होतो. आपण हळूहळू शेतकरी, विणकर, भंगी व गुराखी होणार आहोंत, पायखाने साफ करण्याची साधना हीदेखील राष्ट्रीय शिक्षणाचें महत्त्वाचें अंग आहे. आपणा स्वतःसाठीं व मुलांसाठीं जोंवर आपल्याला दुधाची जरूर आहे तोंवर गोशाळांची काळजी घेतल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

अशा तऱ्हेनें स्त्रियांना आवश्यक असलेल्या शिक्षणाचीं अंगें गांधीजींनीं त्यांच्यापुढें मांडलीं आहेत. परंतु खरें शिक्षण, उत्तम शिक्षण म्हणजे अंतःकरणाचें शिक्षण होय असें बापूजींचें दृढ मत असून त्यावर त्यांचा मुख्य भर आहे. त्यासाठीं पहिली महत्त्वाची गोष्ट निर्भयता ही आहे. जन्ममरणाचा हर्षशोक सोडून दिला पाहिजे. जगणें जर आवडत असेल तर मरणानंतर जन्म यावयाचाच आहे; आणि पुनः जन्म नको असेल तर या जन्मींच मोक्षाची साधना करणें शक्य आहे. तेव्हां दोन्ही दृष्टींनीं मरणाचें भय मनांतून काढून टाकलेंच पाहिजे.

पुरुषाशिवाय आपण असहाय आहोंत, हा विचार पहिल्यांदा मनांतून काढून टाकला पाहिजे. त्यासाठीं दागिने व शृंगारसजावट दोन्ही सोडून दिलीं पाहिजेत. खरें सौंदर्य अंतःकरणांत आहे; तें सौंदर्य कमावलें पाहिजे. नट्टापट्टा करणें व दागिने घालणें हें सगळें विकार वाढवण्यासाठीं आहे. विकारी न होणें याचेंच नांव ब्रह्मचर्य. हें ब्रह्मचर्य साधलें तर या जन्मींच मोक्ष मिळणें शक्य आहे, विकाराचें उच्चाटन झालें तर रोगाचेंहि उच्चाटन होईल. आपल्याला जें यौवन मिळालें आहे, तें विकारांना पोसण्यासाठीं नव्हे तर, त्यांना जिंकण्यासाठीं आहे. कला आपण अवश्य कमवावी; परंतु खरी कला साधी व स्वाभाविक असते, स्वच्छतेंत, नीटनेटकेपणांत बहुतेक कलांचा समावेश होतो. प्रत्येक प्रसंगीं अन्तर्मुख होण्याची कला बापू शिकवतात. चोर आले म्हणजे काय करावें ? या प्रश्नाची चर्चा





अनुक्रमणिका

करीत असतांना त्यांनीं नेमकें सांगून टाकलें कीं, आपण गहाळ राहून अपरिग्रहव्रताचें पालन नीट करीत नाहीं व म्हणूनच चोरी होते. धर्माच्या नांवानें चालणाऱ्या अनेक रूढींचें उच्चाटन करून त्यांनीं असें स्पष्ट सांगितलें कीं, धर्मपालन म्हणजे निःस्वार्थ परोपकार, मनोविकारांवर विजय, भ्याडपणाचा त्याग. कोणतीहि गोष्ट लपवणें हें पाप आहे, कारण असत्याच्या मुळाशीं हिंमतीचा अभाव असतो.

भक्ति हें धर्माचें सर्वांत मोठें व मुख्य अंग आहे. भक्तीची चर्चा करतांना त्यांनीं थोडक्यांत पण अगदीं खोल उतरून सांगितलें कीं भक्ति म्हणजे श्रद्धा, व ही श्रद्धा जितकी परमेश्वराविषयीं असावयास पाहिजे तितकीच स्वतःविषयींदेखील असावयास पाहिजे.

भक्तीची एवढी मूलगामी मीमांसा आपल्याला इतरत्र क्वचितच पाहावयास सांपडेल.

धर्म म्हणजे परोपकार एवढें सांगितल्यावर परोपकारामुळें उत्पन्न होणारा अहंकार व मीपणा काढून टाकलाच पाहिजे हें सांगण्याचा एकहि प्रसंग त्यांनीं सोडला नाहीं, ते येथपर्यंत कीं गंगानदी पावसाळ्यांत विपुल व मूल्यवान् केवटा भोंवतालीं पसरून आपल्या जमिनीस रसाळ बनवते व पुढें वाहत जाते, असें सांगून ते पुढें म्हणतात, ' स्वतः केलेल्या उपकारांचें वर्णन आपल्या मुलांच्या तोंडून ऐकावें लागूं नये म्हणून संकोचामुळें गंगा ताबडतोब पळून जाते ! '

आपल्या देशात जेथें पाहावें तेथें स्वच्छतेचा अभाव आहे. नदीच्या घाटावर, शहरांच्या गल्ल्यांतून, इतकेंच नव्हें तर देवमंदिरांतूनदेखील अस्वच्छता व घाण पसरलेली असते, जणुं घराच्या बाहेर आपली कांहीं जबाबदारीच नाहीं.

या पत्रांतून आरंभापासून अखेरपर्यंत हृदयाच्या शिक्षणाचीच गोष्ट सांगितलेली आहे. सद्वर्तन + अक्षरज्ञान = शिक्षण, अशी सोपी व सरळ व्याख्या करून, निर्भयता आणि सेवानिष्ठा आणि पवित्रता यांतच सर्व सद्वर्तन येऊन जातें असें प्रतिपादन केलें आहे. सेवा करावयाची ती 'आत्मवत् सर्वभूतेषु' होऊन करावयाची आहे; व सेवा करीत असतांना प्रार्थनेंत खंड पडला तरी ती खरोखरच राहून गेली असें होत नाहीं. कारण आणीबाणीच्या प्रसंगीं कर्तव्याचें पालन करण्यांतच प्रार्थना येऊन जाते अशी शुध्द दृष्टि दिल्याशिवाय बापू राहत नाहींत.

मुसाफरी करीत असतांना पाहण्यांत आलेल्या भव्य किंवा आकर्षक घटनांचें वर्णन बापूजींनीं नाहीं केलें असें कसें होणार ! आणि तरीहि देशजागृतीचें महत् कार्य अंगावर घेतल्यावर इतर कामांसाठीं एक क्षणाचीदेखील सवड ते कोठचे काढायला ! त्यामुळें आसामांत गेले असतांना ब्रह्मपुत्रा नदी व तिच्या कांठावर उभारलेल्या कलायुक्त झोपड्यांच्या बनलेल्या कॉंग्रेसकॅंपचें वर्णन किंवा गंगेच्या घाटाची शोभा, बिहारमधील आंबराया, कोलंबो येथील स्त्रियांचा पोशाख, मंडाले (ब्रह्मदेश) किंवा हरद्वारसारख्या शहरांचीं वर्णनें—हें सर्व ते इतक्या थोडक्यांत उरकून टाकतात कीं, त्यांत दाखवलेला संयम आपल्याला बोंचल्याशिवाय राहत नाहीं.

स्त्रियांच्या मनावर बापूजी एकच गोष्ट वारंवार ठसवूं पाहतात : आश्रमांत राहून तयार व्हा, कार्यकुशल व्हा, निर्भय व्हा आणि असहाय स्त्रीवर्गाची सेवा करण्यासाठीं बाहेर पडा.

हरिजनसेवेचें कार्य करीत असतांना देखील स्त्रियांची सेवा करण्याची तितकीच आवश्यकता आहे, ही गोष्ट बापूजींच्या ध्यानांत असे. गोरक्षणाच्या कार्यांतदेखील असहाय स्त्रियांच्या रक्षणाचा त्यांच्या मतें अंतर्भाव होई. स्त्रियांनीं आपलें वैशिष्ट्य जरूर संभाळावें, परंतु स्वतःला पुरुषांपेक्षां कमी लेखूं नये याविषयीं ते सतत जागरूक असत. स्त्रीजातीच्या उद्धारासाठीं गांधीजी स्वतः स्त्री झाले होते असें म्हटल्यास मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं. त्यांनीं अलौकिक तऱ्हेनें स्त्रीहृदय कमावलें होतें आणि त्यामुळेंच त्यांना स्त्रियांच्या अन्तःकरणाचा ठाव घेतां येई.

बापूजींनीं स्त्रीजातीच्या सेवेसाठीं कायकाय केलें व त्याचें काय फळ आलें हें स्त्रीजातीच्याच एखाद्या प्रतिनिधीनें विस्तारपूर्वक सांगितलें पाहिजे. गांधीयुगाबरोबर स्त्री-जागृतीच्या एका विशिष्ट युगाचा प्रारंभ होतो.





अनुक्रमणिका

प्रा. प. वि. पटवर्धन

# ग्रेट ब्रिटनची आरोग्य-योजना

ब्रिटनची सामाजिक आरोग्य–योजना हा एक उदात्त प्रयोग असून, अखिल जगांत इतकी व्यापक, इतकी उदात्त तत्त्वावर आधारलेली अशी ही पहिलीच योजना अमलांत आणण्याचा मान ब्रिटननें मिळविला आहे. अमेरिकेंसुद्धां जगांतील सर्व राष्ट्रांना ब्रिटनलाच या बाबतींत आदर्श मानावें लागेल. सरकारनें, लॉर्ड बीव्हरीज यांनीं आपल्या सुप्रसिद्ध अहवालांत पंचमहाराक्षस म्हणून ज्यांना संबोधिलें आहे त्या दैन्य, रोगराई, अज्ञान, घाण आणि बेकारी ह्यांपासून जनतेचें संरक्षण करण्याची जबाबदारी पत्करली आहे. 'लंडन इकॉनॉमिस्ट' ह्या पत्राचे संपादक मि. जिआफ्रे क्राउदर यांचे मतें "लोकशाही राष्ट्रांतील प्रत्येक नागरिकाला किमान पक्षीं पुढील गोष्टी मिळाल्याच पाहिजेत : आरोग्यरक्षण उत्तमप्रकारें होईल इतकें वार्षिक उत्पन्न; योग्य प्रमाणांत रहावयास जागा, कपडे व जळण; शिक्षणाची सोय, तें घेण्याला सर्वांना भरपूर पण सारखा वाव; आणि बेकारी, आजार आणि वार्धक्य या तिन्ही प्रसंगीं साहाय्य." आपल्या भारताच्या नव्या घटनेंतसुद्धां सरकारची ही जबाबदारी मान्य करण्यांत आली आहे [परिच्छेद ३२, ३४]. ही जबाबदारी सरकारनें घेण्याचें कारण म्हणजे प्रत्येक नागरिकाला आपल्यापरीनें शक्य तितके प्रयत्न करूनसुद्धां या पंचमहाराक्षसांना जिंकणें अशक्य झालें आणि आजकालच्या 'लोकोपयोगी' म्हणवून घेणाऱ्या राष्ट्रीय सरकारांना जनतेचा या बाबतींतील असहायपणा बघणें अशक्य झालेंहें च होय.

## आरोग्य–योजनेला डॉक्टरांचा विरोध

लॉर्ड बीव्हरीज यांनीं आपला सामाजिक सुरक्षिततेच्या प्रश्नावरील सुप्रसिद्ध अहवाल १९४२ सालीं प्रसिद्ध केला. या रिपोर्टांत सरकारनें सर्व जनतेसाठीं विनामूल्य औषधोपचार–पद्धति चालू करावी या तत्त्वाचा पुरस्कार करण्यांत आला होता. या योजनेचा खर्च बीव्हरीज यांनीं सुचविलेल्या सामाजिक सुरक्षिततायोजनेसाठीं मिळणाऱ्या रकमेंतून आणि कांहीं, सरकारी खजिन्यांतून करावा असें सुचविण्यांत आलें होतें. तसेंच दांत व डोळे यांवरील उपचार, विशेषज्ञ डॉक्टरांकडून तपासणी व सल्ला, हॉस्पिटलची सोय, सर्व प्रकारची उपचाराचीं साधनें, व नेहमीं डॉक्टरांची मदत या गोष्टी जनतेला त्यांसाठी...य उपलब्ध व्हाव्या व केवळ दारिद्र्यामुळें कोणाला योग्य ती वैद्यकीय मदत मिळाली नाहीं असें होऊं नये अशाच प्रकारची ही योजना होती.

या रिपोर्टाला डॉक्टरी धंद्यांतील प्रतिष्ठितांकडून जोराचा विरोध झाला; कारण त्यामुळें आपल्याला नोकरी—आणि तीहि स्थानिक अधिकाऱ्यांच्या हाताखालीं—करावी लागेल आणि आपल्या धंद्यांतील स्वातंत्र्य नाहींसें होईल अशी त्यांना भीति वाटली. म्हणून, फार तर ही राष्ट्रीय योजना गरीबांपुरतीच मर्यादित ठेवावी असें मत त्यांनीं

1 'Report on Health Insurance for Industrial Workers'-B.P.Adarkar(1944)





अनुक्रमणिका

मांडलें; कारण त्यामुळें खाजगी धंदा करून मध्यमवर्गीय व श्रीमंत लोकांकडून पैसे मिळवितां येतील असें त्यांस वाटत होतें. परन्तु अशा तऱ्हेचे निर्बंध घालणें म्हणजे सर्व जनतेला सारखाच उपयोग व्हावा म्हणून ही जी राष्ट्रीय योजना मांडली होती तिला मुळांतच उखडल्यासारखें झालें असतें. उलटपक्षीं, ज्यांना औषधोपचारासाठीं अधिक पैसा खर्च करण्याची ऐपत आहे त्यांना तो खर्चण्यापासून परावृत्त करणें म्हणजे त्यांच्या मूलभूत स्वातंत्र्यावर गदा आणण्यासारखें होतें. तेव्हां एकाच वेळीं गरिबांना मोफत व इतरांना विकत औषधोपचार, असें स्वरूप या योजनेला मिळालें असतें. आणि डॉक्टरांनीं पैसे देणाऱ्या आणि न देणाऱ्या दोघांनाहि सारखेच उपाय करावे अशी अपेक्षा करावी लागली असती. परन्तु हें अपेक्षणें मानवी स्वभावाच्या विरुद्ध आहे आणि असेंच मत मि. जी. डी. एच. कोल या अनुभवी लेखकानें स्पष्टपणें मांडलें आहे.[१]

डॉक्टरी पेशाशीं काडीचाहि संबंध नसलेल्या स्थानिक अधिकाऱ्यांच्या हुकमतीखालीं काम करूं नये असें डॉक्टरांना वाटणें अगदीं साहजिक आहे. कारण नोकरशाही पद्धतीची स्वतंत्रपणें धंदा करणाऱ्यांना उपजतच नावड असते आणि धंद्यांतील स्वातंत्र्य टिकविण्याचा त्यांना दांडगा अभिनिवेश असतो. डॉक्टरांची इच्छा आरोग्य-मंत्र्यांच्या सर्वसाधारण देखरेखीखालीं असलेल्या, परन्तु त्यांच्या व इतर स्थानिक अधिकाऱ्यांच्या प्रत्यक्ष हुकमतीखालीं नसलेल्या अशा एखाद्या संस्थेकडून या योजनेचें कार्य चालावें अशी होती. परन्तु इंग्लंडमध्यें स्थानिक अधिकारीच आरोग्यकेंद्रें कित्येक वर्षें चालवीत आहेत व त्यांच्याकडून एकदम हें काम काढून घेणें शक्य नाहीं; त्यामुळें नवी योजना यशस्वी होण्यासाठीं त्यांचें सहकार्य घेणें आवश्यकच होतें.

बीव्हरीज यांच्या योजनेला प्रथम थोडाफार विरोध झाला; परन्तु तो सार्वत्रिक स्वरूपाचा नव्हता. फार काय, या धंद्यांत जे नवीन लोक होते त्यांनीं या योजनेला ताबडतोब संमति दिली. कारण, कांहींच प्राप्ति न होतां बेमुदत तिष्ठत बसण्यापेक्षां, खात्रीचें वाजवी वेतनहि त्यांना अधिक बरें वाटलें. ब्रिटिश मेडिकल असोसिएशननें बीव्हरीज योजनेवरच बव्हंशीं आधारलेल्या सर्वपक्षीय मंत्रिमंडळानें पुरस्कारलेल्या योजनेवर ज्या वेळीं मतें घेतलीं त्या वेळेस हेंच स्पष्ट झालें. ह्यावेळीं सर्व डॉक्टरांना प्रश्नपत्रिका भरावयास दिल्या होत्या, त्यावरून त्यांचीं मतें समजलीं. जवळजवळ ६२ टक्के लोकांनीं पगारी कामाच्या बाजूनें व फक्त २९ टक्के लोकांनीं फी घेऊन काम करण्याच्या बाजूनें मतें दिलीं. ६० टक्के लोकांनीं ही योजना सर्वांना लागू करावी असें प्रतिपादलें, तर फक्त ३७ टक्क्यांना ती गरिबांपुरती मर्यादित करणें बरें वाटलें.

अशा प्रकारें ब्रिटिश मेडिकल असोसिएशनच्या गोटांतच विरोधकांचें बहुमत आढळल्यानें सरकार-प्रणीत योजनेच्या विरुद्ध प्रचारांतील जोरच नाहींसा झाला. पुढें १९४५ मध्यें ज्या निवडणुका झाल्या त्यांमध्यें सर्वपक्षीय मंत्रिमंडळ कोलमडून मजूरपक्षीय सरकार अधिकारावर आलें आणि आरोग्य खातें मि. ॲन्यूरन बेव्हान या कर्तृत्वशील आणि तडफदार गृहस्थांकडे सोपविण्यांत आलें. मि. बेव्हान यांचें सर्व आयुष्य लढण्यांत गेलें आहे. हा एका खाणी-कामगाराचा मुलगा. पुढें स्वतः खाणी-कामगार झाला आणि त्यांतून वाढत वाढत आज एक माननीय मंत्री बनला आहे. स्वतः कामगारवर्गांतूनच वर आल्यानें कामगारवर्गाला औषधें आणि वैद्यकीय मदत मोफत मिळवून देण्याचा त्यानें चंगच बांधला होता आणि डॉक्टरी धंदा करणाऱ्या लोकांच्या खऱ्या अगर खोट्या अडचणींबद्दल त्याला कदर नव्हती. अशा जबरदस्त माणसाशीं सामना देणें ब्रिटिश मेडिकल असोसिएशनच्या नशिबीं आलें. त्यांनीं आपलीं गाऱ्हाणीं त्यांचेपुढें मांडलीं.

---

१ 'Intelligent Man's Guide to Post-war World'—*G. D. H. Cole.*

अखेरीस ब्रिटिश मेडिकल असोसिएशननें सरकारी मसुद्यांतील बहुतेक कलमें मान्य केलीं. आणि मि. बेव्हान यांनींहि डॉक्टरांना सरकारी नोकरींत यावें लागलें तरी धंद्यांतील त्यांचें स्वातंत्र्य, मान व मतें यांचें रक्षण केलें जाईल असें आश्वासन दिलें.

## " जन्मापासून मृत्यूपर्यंत "

('From the cradle to the grave')

अशा रीतीनें ५ जुलै १९४८ ला इंग्लंडमध्यें सामाजिक सुरक्षिततेचें एक नवीन युग सुरू झालें. कारण त्या दिवशीं जनतेच्या सुरक्षिततेसंबंधीं इंग्लंड-मध्यें जे जे निरनिराळे पांच कायदे अस्तित्वांत होते त्यांना एकत्रित करणारी व त्या सर्वांवर कळस चढविणारी अशी अतिव्यापक, सर्वंकष समाज-सुरक्षिततेची योजना अमलांत आली.

प्रस्तुत निबंधांत या योजनेच्या 'आरोग्य' या भागांबद्दलच आपणांस विचार करावयाचा आहे. परंतु राष्ट्राचें आरोग्य हें राष्ट्राच्या इतर अंगांवरहि अवलंबून असतें; त्यामुळें इतर प्रश्नांबरोबरच साकल्यानें आरोग्याचा विचार करावयास हवा. शिवाय बदलत्या सामाजिक परिस्थितीचा आरोग्या-वरहि परिणाम होतो; आणि खरोखर तें इष्ट अशा वातावरणांतच वाढीस लागतें. म्हणूनच, केवळ आरोग्यवृद्धीसाठींच म्हणून केलेल्या गोष्टी जरी आपल्या परीनें स्वागतार्हच असल्या, तरी त्या सामाजिक सुरक्षिततेच्या योजनेचा एक पूरक भाग म्हणून जर अमलांत आल्या तर त्या अधिक फलदायी होतील.

प्रथम आपण या सर्वंकष योजनेचा साकल्यानें थोडक्यांत आढावा घेऊं आणि नंतर आरोग्य-विभागाची विस्तारानें चर्चा करूं. ही नवी विम्याची योजना जुन्या योजनांपेक्षा पुष्कळच सरस आहे. मागच्या योजनेंत गेल्या महायुद्धाच्या सुरवातीला जवळजवळ १ कोट ८० लक्ष लोकांचा समावेश झाला होता; तर नव्या योजनेंत सर्व लोक सामील आहेत. सर्व लोकांचे एकूण तीन विभाग पाडले' आहेत. (१) नोकरी करणारे (२) स्वतंत्र धंदा करून राहणारे (३) कसल्याहि प्रकारचें उत्पन्न नसणारे. सुरक्षितते( Insurance )साठीं या सर्व विभागांना दर आठवड्याला ठराविक वर्गणी भरावी लागते; परंतु फायदेहि भरपूर मिळतात; वर्गणीच्या मानानें ते खूपच असतात. उदा०—एकादा मनुष्य जर आजारी असेल तर त्याला दर आठवड्याला २६ शिलिंग आणि त्याच्या बायकोलाहि १६ शिलिंग आणि प्रत्येक मुलामागें ७ शि. ६ पे. वेगळे मिळतात. स्त्रियांना बाळंतपणासाठीं प्रत्येकीं ४ पौंड मिळतात. हप्ते भरणाऱ्या प्रत्येकाला सेवानिवृत्तीनंतर ६५ व्या वर्षी दर आठवड्याला २६ शिलिंग व त्याच्या बायकोला १६ शिलिंग मिळतात. ७० वरील सर्व पुरुषांना व ६५ वरील सर्व स्त्रियांना या योजनेचे फायदे स्वहक्कानेंच विनामूल्य मिळतील. मृत्यूनंतर उत्तरक्रियेसाठींहि प्रत्येकीं २० पौंड मिळ-ण्याची तरतूद केली आहे. हे दर विपत्तिकाल चालू असेपर्यंत दर आठवड्याला मिळतात. यासाठीं प्रत्येकाला आपापल्या विभागाला लागू असलेला विमाहप्ता भरावा लागतो. हे हप्ते वय, लिंगभेद व वर उल्लेखिलेले तीन विभाग यांजवर अवलंबून असतात; याव्यतिरिक्त ते प्रायः सारखेच असतात.

याखेरीज कौटुंबिक मदत, खास लहान मुलांना मिळणारी मदत ( ही हल्लीं जवळजवळ ४० लाख मुलांना मिळते ) ती वेगळीच. आवश्यक वस्तूंच्या किंमती खालीं रहाव्या म्हणून सरकार दरसाल सुमारें ४० कोट पौंड खर्च करतें. ५ वर्षांखालील मुलांना अगदीं नाममात्र किंमतीला दूध मिळतें. गरजू मुलांना संत्र्यांचा रस आणि कॉडलिव्हर ऑईल मोफत किंवा खास सवलतीच्या दरानें मिळतें. पुष्कळ शाळांतून मुलांना दुपारचें जेवण आणि दूध फुकट देतात. तसेंच शाळेंत मिळणाऱ्या वैद्यकीय मदतीला पैसे पडत नाहींत.

ही झाली सर्वसाधारण सुरक्षितता-—आणि — तदनुषंगिक राष्ट्रीय मदतीची योजना. आतां या सर्वव्यापी योजनेच्या आरोग्य-विषयक भागाकडे वळावयाचें.

## राष्ट्रीय आरोग्ययोजना

या योजनेंतील प्रथम लक्षांत येणारी गोष्ट म्हणजे कोणालाहि विनामूल्य औषधी व वैद्यकीय








# ग्रेट ब्रिटनची आरोग्य-योजना

मदत मिळूं शकते ही होय. वरील परिच्छेदांत उल्लेखिलेले साप्ताहिक दर सामाजिक सुरक्षिततेचा भाग असून ते भरणाऱ्यांना जे फायदे मिळतात तें या मोफत वैद्यकीय मदतीशिवाय निराळे आहेत. शिवाय ही मोफत योजना केवळ ब्रिटिश लोकांपुरतीच मर्यादित नसून ब्रिटनमध्ये असतांना जे जे लोक आजारी पडतील त्या सर्वांनाच लागू आहे.

ब्रिटनच्या आरोग्य-मंत्र्यांनीं खालील बाबतींतील प्रत्यक्ष जबाबदारी आपणांवर घेतली आहे.

( १ ) हॉस्पिटल उपचार आणि तज्ज्ञ डॉक्टरांची मदत या गोष्टी सर्व राष्ट्राला पुरविणें.

( २ ) मानसिक उपचार व आरोग्यविषयक इतर बाबी यांची पूर्तता करणें.

( ३ ) शारीरिक आजार अगर मानसिक विकृति यांचा प्रतिबंध, त्यांचें निदान-व त्यांवरील उपचार यांबाबत संशोधनाची योजना करणें.

( ४ ) सार्वजनिक आरोग्यरक्षणासाठीं प्रयोगशाळेची व्यवस्था करणें.

( ५ ) रक्तदानाची सोय करणें.

याखेरीज त्यांनीं खालील बाबतींत अप्रत्यक्ष जबाबदारी स्वीकारली आहे.

( १ ) आरोग्यकेंद्रांची स्थापना करून तीं चालविणें, ( २ ) सर्वसाधारण औषधी मदतीची योजना आंखून ती मदत पुरविणें, ( ३ ) इतर सोयींची व्यवस्था पाहणें. या सोयींत खालील गोष्टी समाविष्ट आहेत : (अ) फॅमिली डॉक्टर व दंतवैद्यांची सोय. (आ) स्थानिक आरोग्य-केंद्रें (इ) प्रादेशिक मंडळाच्या नेतृत्वाखालीं हॉस्पिटलांतील 'आंतील' व 'बाहेरील' रोग्यांकरतां हॉस्पिटलें व तज्ज्ञ डॉक्टरांच्या मदतीची सोय (ई) स्थानिक अधिकाऱ्यांच्या देखरेखीखालीं शिशुसंगोपन, सुइणी इत्यादि पूरक सोयी ( उ ) कांहीं अटींवर मोफत औषधें, चष्मे व इतर उपकरणीं यांची मदत. आपली जबाबदारी पार पाडण्याच्या कामीं आरोग्य-मंत्र्यांना मध्यवर्ती आरोग्यमंडळ आणि निरनिराळ्या विभागांतील प्रादेशिक समित्या यांचें साहाय्य व सल्ला मिळत असतो. या मध्यवर्ती मंडळांत निरनिराळ्या क्षेत्रांतील अनुभविक तज्ज्ञ असतात; तसेंच, निरनिराळीं प्रादेशिक मंडळें, शैक्षणिक हॉस्पिटलांचीं संचालकमंडळें, कार्यकारी मंडळें, आणि स्थानिक आरोग्य अधिकारी यांच्या मार्फतहि आरोग्यमंत्र्यांना आपलें काम करून घेतां येतें.

कुटुम्बांची डॉक्टरी मदतीची व्यवस्था पहाण्यासाठीं एकंदर १३८ कार्यकारी मंडळें आहेत पूर्वी स्थानिक अधिकाऱ्यांकडे असलेलीं कामें-उदा० बाळंतपणें, शिशुसंगोपन, आरोग्यतपासणी इत्यादि—हीं आतां कौंटीकौन्सिलां-( स्थानिक स्वराज्यसंस्थां)कडे सोंपाविण्यांत आलीं आहेत. अशीं एकूण १४६ कौन्सिलें आहेत. त्यांनीं नवीन आरोग्य-केंद्रेंहि लागतील त्याप्रमाणें उघडावयाचीं आहेत.

सर्व खाजगी व स्थानिक अधिकाऱ्यांच्या हाताखालील हॉस्पिटल्स सरकारनें आपल्या ताब्यांत घेतलीं आहेत; मात्र निरनिराळ्या युनिव्हर्सिटींना जोडलेलीं शैक्षणिक हॉस्पिटल्स ताब्यांत घेतली नाहींत. या हॉस्पिटलांची आणि तज्ज्ञ डॉक्टरांची एकत्रित व्यवस्था प्रादेशिक हॉस्पिटलमंडळाकडे सोंपविली आहे. या मंडळावर डॉक्टरी धंद्यांतील व इतर लोकांनाहि नेमलें असून आरोग्य-मंत्र्यांच्या वतीनें त्यांनीं काम पहावयाचें असतें. या मंडळांनीं हॉस्पिटलें, अगर हॉस्पिटलसमूह यांचे व्यवस्थेसाठीं स्थानिक हॉस्पिटल-समित्या नेमावयाच्या असतात. हीं हॉस्पिटलें जवळजवळ स्वयंशासितच आहेत.

स्वतंत्र संचालकमंडळांच्या अधिकाराखालीं चालू असलेलीं शैक्षणिक हॉस्पिटलें हीं प्रायः स्वतंत्रच आहेत. परंतु त्यांनीं प्रत्येक विभागांतील हॉस्पिटलशीं संबंध ठेवून काम करावयाचें आहे; कारण वस्तुतः खाजगी व शैक्षणिक हॉस्पिटलें हीं एकाच व्यवस्थेचीं दोन अंगें आहेत.

खाजगी हॉस्पिटलांच्या निधींचा एक हॉस्पिटल-सहायक-निधि निर्माण करण्यांत आला असून त्याची व्यवस्था नवीन प्रादेशिक मंडळाकडे सोंपविण्यांत आली आहे.








या सर्व हॉस्पिटलांना चालविण्याची आणि आर्थिक मदत देण्याची जबाबदारी सरकारनें स्वतः पत्करली आहे.

आरोग्य-केंद्र ही एक उपयुक्त संस्था आहे. तेथें डॉक्टरांना आणि दंत-वैद्यांना प्रॅक्टिस करतां येतें. स्थानिक संस्थांच्या आरोग्यविषयक हालचालींना वाव मिळतो आणि सर्व लोकांना आरोग्य-शिक्षणाचें प्रात्यक्षिक ज्ञान मिळतें. हीं केंद्रें स्थापणें, तेथें माणसें नेमणें व इतर व्यवस्था लावणें हीं कामें कौंटी कौन्सिलांचीं आहेत. या केंद्रांत काम करणारे डॉक्टर मात्र त्यांच्या हुकमतीखालीं वागत नाहींत. निरनिराळ्या विभागांतील कार्यकारी मंडळांबरोबर डॉक्टर लोकांचे करारमदार झाले आहेत आणि त्यांना खाजगी प्रॅक्टिस करण्याची मुभा आहे. सरकारी नोकरींत दोन प्रकारें मोबदला मिळतो. एक म्हणजे दर वार्षिक ठराविक तनखा आणि स्वीकारलेल्या प्रत्येक रोग्याबद्दल ठराविक फी, किंवा थोड्या अधिक दरानें नुसती फीच. हा किमान दर प्रत्येक रोग्यामागें १७ शिलिंग असून कोणाहि डॉक्टराला ४००० पेक्षां प्रत्येक वर्षाला अधिक रोगी घेतां येत नाहींत. याखेरीज डॉक्टरांना सरकारकडून आणखीहि कांहीं पैसे मिळण्याची शक्यता असते. उदा०—प्रत्येक बाळंतपणाची त्यांना सुमारें ७५ ते १०० रु. फी मिळते. त्याचप्रमाणें भूल देणें, शैक्षणिक हॉस्पिटलमध्यें औषधें देणें किंवा मदतनीस तयार करणें यासाठीं त्यांना वेगळा मेहनताना मिळतो. रोग्यांना आपला डॉक्टर निवडण्याचें स्वातंत्र्य असतें. त्याचा नेहमींचा डॉक्टर या योजनेंत भाग घेत असेल तर त्याला किंवा दुसऱ्या कोणाहि योग्य शिक्षण घेतलेल्या डॉक्टरांना या योजनेंत भाग घेतां येतो; पण तसें करण्याची त्यांचेवर सक्ती नाहीं. योजनेच्या सुरवातीला डॉक्टरांना त्यांच्या सध्यांच्या जागीं प्रॅक्टिस करण्याची परवानगी देण्यांत आली. पण आतां नव्यानेंच योजनेंत येणाऱ्या डॉक्टरला एखाद्या विशिष्ट जागींच राहावयाचें असेल तर त्याला डॉक्टर-समितीची परवानगी घ्यावी लागेल. आणि त्यानें मागितलेल्या विभागांत जर आधींच बरेच डॉक्टर असतील तर त्यांला परवानगी मिळणार नाहीं. जेथें डॉक्टरांचा तुटवडा आहे अशाच भागांत त्याला राहणें भाग पडेल. कमी मिळकतीच्या प्रदेशांतहि डॉक्टरांनीं सरकारी योजनेनुसार काम करावें म्हणून कांहीं खास सवलती देण्यांत आल्या आहेत. धंदा विकणें बेकायदेशीर ठरविलें आहे. मात्र ५ जुलै १९४८ रोजीं जे डॉक्टर या योजनेंत आले त्यांना थोडीफार नुकसानभरपाई देण्यांत आली. ती देण्यासाठीं सरकारनें ६ कोटी ६० लक्ष पौंडांचा स्वतंत्र निधि आधींच वेगळा काढून ठेवला होता.

अशा रीतीनें लोकांच्या तब्येतीची काळजी जन्मापासून मृत्यूपर्यंत सरकार वाहतें; म्हणून या अतिव्यापक योजनेला "जन्मापासून मृत्यूपर्यंत" "from the cradle to the grave" असें संबोधण्यांत येतें.

## एका प्रख्यात अमेरिकन वार्ताहराचा पुरावा

ही योजना विशाल स्वरूपाची आहे. औषधें, शस्त्रक्रिया, उपकरणें व हॉस्पिटलांतील वास्तव्य याकरितां आतां कोणालाही फुटकी कवडीसुद्धां द्यावी लागत नाहीं. "उदार हस्तें कमलावरानें, देतां किती घेशिल दो करानें" असें या योजनेचें स्वरूप आहे. आरोग्यमंत्र्याच्या हातांतून सर्व कांहीं आपोआप येतें. मि. स्पेन्सर नांवाचे एक प्रख्यात अमेरिकन वार्ताहर ही योजना खरोखरच कशी चालत आहे याची 'चक्षुर्वै सत्यं' चौकशी करण्याकरतां इंग्लंडला गेले होते. त्यांच्याच शब्दांत सांगावयाचें तर,

"प्रत्येकाला आपला डॉक्टर निवडतां येतो; मात्र तो या योजनेंत सामील झालेला असला पाहिजे. [बहुतेक डॉक्टर सामील झालेच आहेत आणि त्यांचीं नांवें पोस्ट ऑफिसांत लागलेलीं असतात]. प्रत्येकानें एक फॉर्म भरावयाचा असतो; त्यांत नांव, गांव वय आणि पत्ता घालून तो आपल्या डॉक्टरकडे द्यावयाचा. त्या डॉक्टरकडे जागा नसेल, अगर त्याला तुम्हांला घेण्याची इच्छा नसेल, तर तुम्ही दुसऱ्या कोणत्याहि डॉक्टरला निवडावें. जर तेथेंहि तुमची वर्णी लागली नाहीं,







तर स्थानिक कार्यकारी मंडळा( Executive Council )कडे दाद मागावयास पाहिजे. तें मंडळ तुम्हांला एका डॉक्टरकडे पाठवील. तुम्हांला एक पिवळें ओळखपत्र मिळेल—तें तुम्ही सतत जवळ बाळगावयाचें. इतकें झालें, कीं तुमच्याकरितां त्या डॉक्टरला दरवर्षी १७ शिलिंग तनखा सरकारकडून सुरूं झालाच म्हणून समजा. ही त्याची फी आहे—मग तुम्ही वर्षातून कितीदांहि जा अगर पुन्हां मुळींच जाऊं नका!

" आतां तुम्हांला काय काय मिळतें तें पहा : दवाखान्यांत डॉक्टर तुम्हांला तपासतात; तुम्हांला बाहेर पडवत नसेल, तर तुमच्या घरींहि येतात. तुम्ही डॉक्टरकडे कितीदां जावें याला कांहींहि मर्यादा घातलेली नाहीं. तुमची सदसद्‌विवेकबुद्धि हीच मर्यादा. तुमच्या ओळखपत्राच्या मागें मात्र एक नम्र सूचना लिहिलेली असते : 'अगदीं अपरिहार्य कारणाशिवाय रात्रीं ८ ते सकाळीं ८ पर्यंत डॉक्टरना बोलवूं नका!'

" तुमचे डॉक्टर तुम्हांला तपासतात आणि औषधें सांगतात. तुम्ही तीं औषध-विक्रेत्यांकडे नेलींत कीं तो तीं विनामूल्य बाटलींत भरून देतो. तुमच्या डॉक्टरना जर वाटलें कीं एखाद्या तज्ज्ञ डॉक्टरनें तुम्हांला तपासावयास हवें, अगर तुम्हांला 'क्ष' किरणांच्या साहाय्यानें किंवा प्रयोगशाळेंत तपासावयास पाहिजे, तर ते तुम्हांला एखाद्या हॉस्पिटलमध्यें पाठवितील; जर तुम्ही फारच आजारी असला तर ते तज्ज्ञ डॉक्टर-लाच तुमच्या उशाशीं आणतील; जर हॉस्पिटल-वास्तव्य आवश्यक असेल तर तुमचे डॉक्टर तुम्हांला एखाद्या हॉस्पिटलमध्यें प्रवेश मिळवून देण्याची खटपट करतील.......

" तुमचे डोळे अधू असून चष्मा पाहिजे असेल तर पुन्हां डॉक्टरकडे जा; ते तुम्हांला 'नेत्रपरीक्षा आवश्यक' अशी चिठ्ठी देतील. ती तुम्ही एखाद्या नेत्रवैद्याकडे किंवा चष्मे विकणाऱ्याकडे घेऊन जा कीं तुमचें काम झालेंच म्हणून समजा. बिल? तें जाईल मि. बेव्हान यांच्याकडे. तुम्ही कानानें अधू आहांत का? मग काळजी कसली करतां? तुमचे डॉक्टर तुम्हांला कानांच्या तज्ज्ञाकडे पाठवितील! थोड्याच वेळांत तुम्हांला एखादें ऐकण्याचें यंत्र मिळेल आणि बॅटरींचाहि पुरवठा सतत ठेवण्याची व्यवस्था होईल. तुमच्या डोक्याला टक्कल पडतें आहे का? लाज वाटते आहे का त्याची तुम्हांला? मग जा डॉक्टरांच्याकडे. त्यांना वाटलें कीं ही गोष्ट प्रकृति-स्वास्थ्याच्या दृष्टीनें हानिकारक आहे, तर तुम्हांला एक—पाहिजे असल्यास दोन—टोप मिळतील. एक वापरावयाला आणि दुसरा धोब्याकडे!

" तुमच्या दातांना कांहीं झालें आहे का? मग सरळ जा एखाद्या दंतवैद्याकडे आणि आपलें काम करून घ्या. सरकार विनामूल्य तुम्हांला लागतील तितक्या आणि लागतील तितक्यांदा कवळ्या पुरवील!

" इंग्लंडमध्यें आजारी पडलांत कीं हें इतकें मिळतें—आणि तें असें मिळावयाचें......निदान या योजनेचा हेतु तरी असा आहे[3]."

आतां प्रत्यक्ष अम्मलबजावणींत थोडीफार दिरंगाई, अडचणी, अडथळे निर्माण होणें अगदीं अपरिहार्य आहे. मुख्यत्वेंकरून तीन दोष आढळतात: (१) डॉक्टरांना फार ताण पडतो (२) दातांचे डॉक्टर, चष्मे विकणारे आणि औषधें विकणारे यांची पोळी पिकली आहे (३) आणि 'मोफत' सोईचा पुष्कळ लोक गैरफायदा घेत आहेत.

### 'व्यक्ती तितक्या प्रकृती'

या योजनेबद्दल अनेकांच्या अनेक अपेक्षा होत्या. या योजनेचा मसुदा पार्लमेंटमध्यें मांडतांना मि. ॲटली म्हणाले होते, " दरवर्षी जनतेच्या अनारोग्यामुळें राष्ट्राची जी अपरिमित हानि होते, ती राष्ट्रीय आरोग्ययोजनेनें व या मसुद्यांतील उपयुक्त सुधारणांनीं भरून येण्यास मदत होईल." या बिलाचें स्वागत करतांना मि. रॉबसन् म्हणाले : " ज्या योगें दारिद्र्य आणि असुरक्षितता नाहींशी करण्याच्या प्रयत्नांना

3. 'How Britain likes socialized medicine'—Steven M. Spencer, 'Saturday Evening Post' [ 14-5-49 & 21-5-49 ]












हुरूप येईल असें तत्त्व, प्रयत्न फलद्रूप करण्याचें साधन हीं दोन्हींहि प्राप्त झालीं आहेत."

"केवळ अपरिहार्य म्हणूनच ब्रिटिश लोक सरकारकडून अधिकाधिक सुखसोयींची अपेक्षा करीत आहेत" असा हवाला मि. स्पेन्सर यांनीं वर उद्धृत केलेल्या लेखांत दिला आहे. पूर्वीपेक्षां सुखसोयी आणि इतर आवडीनिवडी यांजवर अलीकडे लोक अधिक खर्च करीत आहेत हें अनेक कौटुंबिक अंदाजपत्रकांवरून उघडकीस आलें आहे. शिपूटन-येथील एका नामवंत डॉक्टरनें मि. स्पेन्सर यांना सांगितलें : "तसें पाहिलें तर इंग्लंडमध्यें ही योजना अगदीं हवीच होती. जरूर असून सुद्धां केवळ परवडत नाहीं म्हणून पुष्कळ लोक डॉक्टरकडे जात नाहींत!" उलट मिसेस् जिम् बाल्डवीन या शेतकरणीनें सांगितलें : "फार थोडया पैशांत फारफार मिळत आहे लोकांना; सगळेंच मोफत झालें, तर कर इतके वाढतील कीं काम करण्यांत स्वारस्यच वाटणार नाहीं कोणाला!" मिसेस् मेरी स्मिथ या कामगार-स्त्रीनें मात्र सांगितलें, "डॉक्टरचीं बिलें म्हणजे काय असतें तें पुरें आम्हांला ठाऊक आहे. पण आतां आम्ही निर्धास्त आहों. या योजनेमुळें आम्हांला त्यांची कटकट करावयास नको." विल्यम क्रॉफ्ट या कामगाराला मात्र थोडा संशय आहे. तो म्हणाला : "बारीक-सारीक तपशीलांची पूर्ण आखणी केल्याशिवाय ही योजना लागू करण्यांत फार घिसाडघाई सरकारनें केली आहे असें माझें मत आहे. आपण असें धरून चालूं कीं कामगाराचें आरोग्य सतत उत्तम तऱ्हेनें पाळलें जाईल; पण तसें झालें नाहीं तर उत्पादनाचा खर्च निष्कारण वाढविल्यासारखें होईल. आपणांस हव्या असलेल्या पुष्कळ गोष्टी आहेत; पण आपल्या देशाच्या सध्यांच्या आर्थिक परिस्थितींत त्या केवळ चैनीच्याच गणल्या पाहिजेत." नॉर्मन ब्राऊन या एका गृहस्थांच्या मतें "ही राष्ट्रीय योजना आहे उत्तम; पण तिचा दुरुपयोग होत आहे. सरकारनें इतक्या फायद्यासाठीं थोडा जरी चार्ज ठेवला असता तरी हल्लींसारखे लोक तिच्यावर तुटून पडले नसते आणि मग तिची अम्मल-बजावणी अधिक चांगल्या रीतीनें झाली असती. मला असे पुष्कळ लोक ठाऊक आहेत कीं ज्यांनीं या योजनेचा गैरफायदा उपटला आहे." अशा प्रकारें या योजनेबद्दल व्यक्ती तितक्या प्रकृती असणें शक्य आहे. ही योजना अद्याप प्रयोगावस्थे-तच आहे; आणि निश्चित मतें देणें फार धाष्टर्याचें आहे, तथापि या योजनेचा हेतुच इतका उदात्त आहे आणि स्वरूप इतकें विशाल आहे कीं, किर-कोळ दोषांचें अवडंबर माजवितां उपयोगी नाहीं. कालांतरानें ही योजना जाणार नाहीं; हे दोष जातील.

## डॉक्टरांची परिस्थिति

ह्या योजनेबद्दल सर्वांत जास्त मळमळ कोणाला असेल तर ती कांहीं डॉक्टरांनाच. कित्येक पूर्वीच्यापेक्षां निम्याहून कमी प्राप्तीवर पूर्वीपेक्षां दुप्पट राबत आहेत. कित्येकांना खर्च भागविण्यासाठीं ऋण करावें लागत आहे. याचें मुख्य कारण म्हणजे खाजगी धंदा जवळ जवळ बसलाच आहे. ब्रिटनमधील अवघे ५ टक्के लोकच स्वतः पैसे भरून डॉक्टरांकडून औषधें घेत आहेत.

डॉक्टरांची मुख्य तक्रार म्हणजे अगदीं कारण नसतांना सुद्धां फार लोक त्यांचेकडे येतात. त्यामुळें खरेखुरे जे आजारी आहेत त्यांचेकडे लक्ष देण्यास त्यांना फुरसतच मिळत नाहीं. रोगाचें निदान यातपणें करणें मुष्कील होतें. एक सुप्रसिद्ध डॉक्टर मि. स्पेन्सरना म्हणाले : 'कित्येकदां बऱ्याच लोकांना डॉक्टरकडून काय पाहिजे असतें तर कसलें तरी सर्टिफिकेट, नाहीं तर एखाद्या प्रिस्क्रिप्शनवर सही.' नाना तऱ्हेचीं सर्टिफि-केट्स असतात. आजारी म्हणून कामावर न जाण्याचें सर्टिफिकेट, आजारानंतर कामावर रुजूं होण्याचें सर्टिफिकेट, शेकण्याच्या विजेच्या टोल्यासाठीं जादा कोळसा, धान्य, कपडे मिळविण्याकरितां—या आणि अशा शेंकडों गोष्टी करतां सर्टिफिकेट्स् लागतात. एखाद्या कुटुम्बाला जरा चांगल्या जागेंत रहावेंसें वाटलें तर प्रमुखानें डॉक्टरकडे जावें आणि योग्य त्या परवान्यावर त्याची सही घ्यावी कीं, सरकारनें खास बांधलेल्या घरांतलें एखादें

टुमदार घर मिळतें. गरोदर स्त्रियांना, डॉक्टरच्या सर्टिफिकेटवर जादा धान्य, संत्र्यांचा रस आणि व्हिटॅमिन्स मिळवितां येतात. अर्थातच डॉक्टर्स या कारकुनीला कंटाळले आहेत. यांत आपला वेळ घालविण्यापेक्षां तो रोग्यांकडे जाण्यांत आणि दुःखितांच्या शुश्रूषेत घालविणें किती आवडेल ! आणि ही सारी उचापत पूर्वीपेक्षां कमी पैशांत करावयाची !

अगदीं खोऱ्यानें पैसे ओढणाऱ्या डॉक्टरांचें नुकसान झालें असणें शक्य आहे. आणि अशीं कांहीं उदाहरणेंहि आहेत. त्यामुळें कांहीं डॉक्टर्स यांतून बाहेरहि पडले आहेत. आरोग्य-मंत्र्यांनीं पार्लमेंटध्यें सांगितलें कीं या योजनेच्या पहिल्या ७ महिन्यांत ४९७ डॉक्टरांनीं राजीनामे दिले. उलट ६०२ लोक नवीन भरती झाल्याचेंहि त्यांनीं सांगितलें; परंतु येणाऱ्यांपेक्षां जाणाऱ्या लोकांनाच अधिक महत्त्व आहे. कारण दिवसेंदिवस भरती होणारे लोक वाढणारच ! नाहीं तर उपाशीं रहाण्याची पाळी यावयाची बिचाऱ्यांवर ! कारण खाजगी फी देणाऱ्या लोकांचें प्रमाण दिवसेंदिवस जोरानें घटत आहे.

गजबजलेल्या औद्योगिक विभागापेक्षां दूर ग्रामीण भागांत रहाणाऱ्या डॉक्टरांचें जास्त नुकसान होत आहे; कारण त्यांना त्या प्रमाणांत कमी रोगी मिळतात. ग्रामीण भागांत काम करणाऱ्या डॉक्टरांना, घरापासून दोन मैल किंवा अधिक दूर असणाऱ्या रोग्यांच्या घरीं जाण्यास दर मैलीं कांहीं भत्ता मिळतो हें खरें; तथापि घरीं जाण्यांत जो वेळ जातो त्याची भरपाई कांहीं या किरकोळ भत्त्यानें होत नाहीं.

खास तज्ज्ञ वगळले तर बाकी सर्व डॉक्टरांना सारखेंच वेतन मिळतें अशी आणखी एक तक्रार आहे. ज्ञान, वय अनुभव यांचें व्हाव तसें चीज होत नाहीं. त्यामुळें कालांतरानें धंद्यात राम रहाणार नाहीं असें त्यांना वाटतें.

या प्रयोगाबद्दल अमेरिकेंत सिनेटर मरे आणि अमेरिकन मेडिकल असोसिएशनचे अध्यक्ष डॉ. सेन्सेनिक यांच्यांत बराच वाद-विवाद झाला,[4] तो बराच उद्बोधक आहे. सीनेटर मरे यांनीं, इंग्लंडमधलि बहुसंख्य डॉक्टर या योजनेंत सामील झाले आहेत, असें सांगून त्यांना ही योजना पसंत असल्याचा निर्वाळा दिला. उलट डॉ. सेन्सेनिक यांनीं अहवालाचा आधार घेऊन प्रतिपादलें कीं, " डॉक्टर्सना काम झेंपत नाहीं; एकेकाच्या वाटणीला ४००० ते ५००० रोगी येणार; चार चार तासांत ४० ते ६० घरांची वारी करावयाची ! मग शांतपणें रोग्यांची परीक्षा आणि निदान करण्यास वेळ कसचा मिळणार ! पुजवी औषधयोजना करावयासद्धां तोकडा वेळ ! दंतवैद्यांना तर पुढील ४।५ महिन्यांचें काम ' आगाऊ '-च मिळालें आहे आणि पुढील १२ महिन्यांत नवीन रोगी घेतले जाणार नाहींत, अशा पाट्या लावण्याची पाळी बिचाऱ्यांवर आली आहे. एका दंत-वैद्याकडे १० खुर्च्यांची रांग असून तो हाताखालीं तीन मदतनीस घेऊन एकाच वेळीं चार रोग्यांना उपचार करतो ! आणि एकटाच सरकारकडून १,६०,००० डॉलर्स—सुमारें ८ लाख रुपये उकळतो ! "

## यशस्वी : योजना

या तक्रारींत थोडेंफार तथ्य आहे. ढिलाई, दीर्घसूत्रीपणा, लांचलुचपत, हें सर्व आहे; आणि तें त्याज्य आहे. इतकें असूनहि मात्र, योजना अयशस्वी झाली असें म्हणतां यावयाचें नाहीं. " सुरवातीच्या आठ महिन्यांत कार्यक्षम परिचारक आणि परिचारिका आणि इतर वैद्यकीय आणि शस्त्राक्रियेला लागणारी साधनसामग्री यांनीं परिपूर्ण

4. ' Socialised medicine ? '—" Look " 21 June 1949.





अनुक्रमणिका

अशीं २५०० हॉस्पिटल्स निर्माण झालीं असून त्यांत ३,८८,००० रोग्यांची सोय झालेली आहे. एकूण २१,००० डॉक्टर्सपैकीं १८,५०० पेक्षांहि अधिक, १०००० दंतवैद्यांपैकीं ९००० पेक्षांहि अधिक, सुमारें ५००० नेत्रवैद्य आणि तज्ज्ञ आणि १४,००० पैकीं जवळजवळ सर्व रसायनविक्रेते या योजनेंत सामील झाले आहेत. इंग्लंडमधील सर्व लोकसंख्येपैकीं सुमारें ९३ टक्के लोकांची तरतूद या योजनेनें झाली आहे. या योजनेंत मूलभूतच दोष अगर कोठें विसंगति असती तर तिला एवढें यश मिळालेंच नसतें. तिच्यांत गुण आहेत; आणि त्या गुणांमुळेंच तिला एवढें यश मिळालें आहे. या योजनेचा सर्वांत मोठा गुण म्हणजे, या योजनेखालीं ब्रिटिश नागरिकांचीं मूलभूत स्वातंत्र्यें चिरडलीं गेलीं नाहींत. लोकांनीं या योजनेंत सामील व्हावें अगर न व्हावें. रोग्यानें आपला स्वतःचा डॉक्टर निवडावा; तो नकोसा वाटला तर बदलावा. डॉक्टरला आपलें मत स्पष्टपणें मांडण्यास पूर्ण स्वातंत्र्य आहे; त्याला या योजनेंतील कोणत्याहि भागावर अगर सर्व योजनेवर टीका करण्याचासुद्धां अधिकार आहे. नागरिकांच्या स्वातंत्र्याचें रक्षण या मूलभूत गुणामुळें या योजनेला इतका मोठा पाठिंबा मिळाला आहे. कोणत्याहि पक्षाचें सरकार निवडणुकींत अधिकारावर आलें तरी आतां ही योजना बारगळणार नाहीं.

राष्ट्रीय विमा-योजना आणि आरोग्ययोजना मिळून सरकारला एकूण ८५ कोट पौंड खर्च येणार आहे. यांतील ६० कोट पौंड जनतेकडून हप्त्यांच्या रूपानें यावयाचे आहेत. नुसत्या मोफत औषध-योजनेला १५ कोट पौंड खर्च येईल असें वाटत होतें. पण पहिल्या ९ महिन्यांतच ही रक्कम ३० कोटी पौंडांपर्यंत गेली आहे. पण सर स्टॅफर्ड क्रिप्स यांनीं सांगितलें कीं, आरोग्ययोजना आर्थिक अडचणींमुळें बंद पडूं दिली जाणार नाहीं.

## आतां हें चित्र पहा : हिंदुस्थान !

ब्रिटिश लोकांनीं चालवलेल्या एका उदात्त व विशाल योजनेची आपण रूपरेखा पाहिली. हा विषय येथेंच आटोपणें युक्त झालें असतें; परंतु आरोग्यासारख्या अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार करीत असतां हिंदुस्थानांतील दैन्याची आठवण झाल्याशिवाय रहाणार नाहीं. ब्रिटननें काय केलें हें पाहिलें असतां आपण काय करूं शकूं असा प्रश्न दत्त म्हणून पुढें उभा रहातो. आपली सध्याची आर्थिक स्थिति, आपलें अज्ञान आणि आपली नीतिमत्ता जर ध्यानांत घेतली तर ब्रिटनसारखें कांहीं भव्योदात्त आपणांस करणें आणखी कांहीं वर्षें तरी दूरापास्त आहे हें चटकन लक्षांत येतें. कांहीं आंकडे पहा: हिंदुस्थानांत दवाखाने व इस्पितळें एकूण ७००० आहेत. ब्रिटनसारख्या लहान राष्ट्रांत हाच आंकडा २५,००० आहे. आपणांकडे लहानमोठ्या सर्व दवाखान्यांचें प्रमाण शहरी भागांत तर १३,००० माणसांस एक आणि ग्रामीण भागांत तर ५३,००० माणसांस एक असें आहे! ४३,००० माणसांस एक हॉस्पिटल आणि ४००० माणसांस एक जागा हे आंकडे फारसे आशादायी नाहींत! स्त्रियांसाठीं खास अशीं फक्त २३० हॉस्पिटल्स आहेत. एकूण डॉक्टरांची संख्या अदमासें ५००० असून त्यांतील जवळ जवळ ¾ इतके साधे L. C. P. S.च आहेत. दर दोन हजारांमागें एक डॉक्टर पाहिजे असें म्हटलें तर आपल्याला निदान १,५०,००० इतके डॉक्टर लागतील. दरवर्षी ५००० डॉक्टर्स तयार केले तरी ३० वर्षें थांबावयास पाहिजे. गेल्या युद्धापूर्वी हिंदुस्थानसरकार आपल्या वट्ट खर्चापैकीं अवघा ५ टक्के खर्च आरोग्य खात्यावर करीत असे आणि त्याचें प्रमाण दरडोई दरसाल अवघे ५ आणे पडत असे. इंग्लंडमध्यें हाच आंकडा ३ पौंड होता आणि आतां त्यांत बरीच वाढ झालेली आहे,

हिंदुस्थानांत निरनिराळ्या रोगांचें अनिर्बंध राज्य चालूं आहे. याला मुख्य अपुरें आणि निकस अन्न आणि वैद्यकीय उपचारांचा संपूर्ण अभाव या गोष्टी जबाबदार आहेत. हिंदुस्थानांत दरवर्षी सुमारें १० कोट लोकांना मलेरिया होतो आणि साधारणपणें १० लक्ष लोक त्यानें मरतात. हिंदुस्थान सरकारचे एक वेळचे आरोग्याधिकारी सर जॉन मेगॉ यांच्या मतें युद्धपूर्व काळीं हिंदुस्थानांत सुमारें १ कोट ३० लक्ष लोक लैंगिक रोगानें

पछाडलेले होते, २० लक्ष क्षयानें, ६० लक्ष रात्रींच्या आंधळेपणामुळें जर्जर असून, ६० लाख पूर्ण आंधळे होते. २० लाखांना 'रिकेट्स्' होते. त्यांच्या मतें बाळंतपणांतील मृत्यू दर हजारीं २४ होते. इंग्लंड, हॉलंड व जपान या देशांत हेंच प्रमाण अनुक्रमें दर हजारीं २·६, २·४ आणि ३ असें आहे.

हे आंकडे आपल्या अनारोग्याचें चित्र ढळढळीतपणें उजेडांत आणतात. आपल्या दुःस्थितीचें एकमेव कारण म्हणजे आपलें दारिद्र्य होय. दारिद्र्य आणि अनारोग्य यांच्या तर्कदुष्ट चक्रव्यूहांत आपली असहाय जनता सांपडली आहे. मुंबईयोजनेनुसार १९४१ मधील ३८ कोट लोकसंख्येला जर जुजबी प्रमाणांत आरोग्य-योजना करावयाची असती तर त्या वेळच्या किंमती लक्षांत घरून २८० कोट रुपये-भांडवल खर्च व १८६ कोट रुपये वार्षिक खर्च लागला असता. या साधारण व्यवस्थेसाठींसुद्धां हिंदुस्थानला आजच्यापेक्षां १० पट अधिक डॉक्टर्स लागतील.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ,, | १७० | ,, | ,, शिक्षित परिचारिका | ,, |
| ,, | ७० | ,, | ,, आरोग्य-पर्यवेक्षक | ,, |
| ,, | २६ | ,, | ,, शिक्षित सुईणी | ,, |
| ,, | १००० | ,, | ,, रसायन-शास्त्रज्ञ | ,, |
| ,, | १३० | ,, | ,, दंत-वैद्य | ,, |

नजिकच्या भविष्यकाळांत हें आपणांस साध्य होईल का? तें करण्यास आपणांजवळ पुरेसा वेळ, पैसा आणि बळ आहे का? कशाकडे आपण प्रथम लक्ष देणार? मुख्य म्हणजे तारतम्यानें निरनिराळ्या आवश्यक गोष्टींचें सापेक्ष मूल्य ठरविणें हें आपणांस अद्याप शिकावयाचें आहे. ऐन युद्धकाळींहि ब्रिटननें आरोग्यप्रश्न उपेक्षिला नाहीं. प्रस्तुत योजनेची रूप-रेखा प्रत्यक्ष युद्ध चालू असतां आंखली गेली. आपणांस या प्रश्नास इतकें प्राधान्य देतां येईल का? एक तर आपलें अनारोग्य आतांच नव्यानें आलेलें नाहीं; दुसरें आपल्या नव्या राष्ट्राची अंतर्गत आणि आंतरराष्ट्रीय परिस्थिति अद्याप सुरक्षित नाहीं; आपणांस खावयास पुरेसें अन्न आणि घालावयास पुरेसे कपडे नाहींत. या मूलभूत गोष्टी जोंपर्यंत मिळत नाहींत तोंपर्यंत आरोग्य-योजना करणें कठिण —आणि केली तरी आरोग्य सांभाळणेंहि कठिणच! तथापि आपण हात जोडून स्वस्थ बसणें केव्हांहि समर्थनीय ठरणार नाहीं. मात्र या बाबतींत भल-त्याच आशा बाळगण्यांतहि अर्थ नाहीं. हिंदुस्थान-सरकारच्या आदेशानुसार सर जोसेफ भोर यांनीं जी मर्यादित योजना मांडली तिचें दूरगामी ध्येयसुद्धां दर ५००० माणसांना ६ जागा हॉस्पिटल्समध्यें पुरविणें हेंच आहे. त्यांचे मतें अगदीं अल्पस्वरूपा-ची योजना जर अखिल हिंदुस्थानास लागू कराव-याची असेल तरी ४० वर्षांचा कालावधि लोटला पाहिजे! तेव्हां भलत्याच आशा न बाळगतां जें जें कांहीं आपल्या मर्यादित उत्पन्नांत करतां येणें शक्य आहे तेवढें करून त्यावर समाधान बाळगण्यापेक्षां या दुर्दैवी देशाला जास्त कांहीं करतां येण्यासारखें नाहीं! या बाबतींत केंद्रीय सरकार आणि प्रांतिक सरकारें जागरूक असून त्यांनीं उत्पन्नाच्या सुमारें १५ ते २० टक्के रक्कम आरोग्यावर खर्च करण्याचें ठरविलें आहे हीहि स्वागतार्ह गोष्ट आहे. मुंबई प्रांतांत नुकताच सुमारें २२,३०० खेड्यांना फिरत्या दवाखान्यांचा आणि रुग्णालयांचा फायदा मिळूं लागला आहे. परंतु या गोष्टी म्हणजे आभाळाला ठिगळ लावण्यासारख्याच आहेत. पण सध्यां तरी यापेक्षां अधिक कांहीं होणें शक्य दिसत नाहीं.

---

## चॅप्लिन आणि आइन्स्टाइन

एकदां सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ आइन्स्टाइन आणि सुप्रसिद्ध विनोदी नट चॅप्लिन हे सज्जांत उभे राहून दर्शनेच्छु जनसमुदायाला दर्शन देत होते. खालीं अफाट जनसंमर्द लोटला असून तो त्या दोघांचेहि जोरानें जयघोष करीत होता. तें पाहून चॅप्लिन आइन्स्टाइनना म्हणतात : "हे लोक आपल्यावर बेहद्द खूष आहेत याचें कारण काय ठाऊक आहे? ते माझ्यावर खूष, कारण मी काय करतों हें त्यांना समजतें. ते तुमच्यावरहि खूष, कारण तुम्हीं जें कांहीं करतां त्यांतलें एक अवाक्षरहि त्यांना कळत नाहीं!"





अनुक्रमणिका

प्रा. ना. वा. कोगेकर

# अ ग्नि बा ण (ROCKET)

विमानाचा शोध लागून अतिशय वेगानें भराऱ्या मारणारीं विमानें तयार होतांच मनुष्याचें पृथ्वीपर्यटनाचें फार दिवसांचें स्वप्न सत्यसृष्टींत उतरूं शकलें. विमानाच्या शोधामुळें देशादेशांतील एरव्हीं जाणवणारें अंतर जरी पार नाहींसें झालें तरी आकाशाच्या पोकळींत भ्रमण करणाऱ्या निरनिराळ्या ग्रहांमधील अंतर तोडतां येण्याजोगें एखादें प्रभावी अस्त्र कसें निर्माण करतां येईल या प्रश्नाकडे सर्व शास्त्रज्ञांचें लक्ष फार पूर्वीपासून वेधलें गेलें आहे. सिकंदर बादशहाप्रमाणें, पृथ्वीवर पादाक्रान्त करण्याजोगें आतां कांहींहि राहिलें नाहीं, अशा कल्पनेनें, कांहीं शास्त्रज्ञांचें लक्ष आतां आकाशाच्या अमर्याद पोकळींत अहर्निश भ्रमण करणाऱ्या चंद्र-मंगळ आदि गोलांवर स्वारी करण्याकडे लागलें आहे.

"कोणत्या बरें साधनाचा उपयोग केला असतां चंद्रावरील स्वारीचें हें स्वप्न ताबडतोब जरी नाहीं, तरी निदान नजिकच्या भविष्यकालांत कां होईना, सत्यसृष्टींत उतरूं शकेल?" असा प्रश्न विचारल्यास "अग्निबाण" ( Rocket ) असें उत्तर अगदीं मोजक्या शब्दांत देतां येईल.

तसें पाहिल्यास अग्निबाणाची कल्पना कांहीं नवी नाहीं. तेराव्या शतकांतील चिनी बखरींत अग्निबाणासंबंधींचा उल्लेख सांपडतो. पाश्चात्य देशांतील लोकांना देखील अग्निबाणाची माहिती फार पूर्वीपासून म्हणजे सन १२५८ पासून होती असें दिसतें. याच कालांतील अरबांना देखील वरील अस्त्र पूर्ण परिचित होतें असें दिसतें. दिवाळींत सोडले जाणारे दारूचे बाण हे देखील एक प्रकारें अग्निबाणच नव्हेत काय? फक्त त्यामधून चित्रविचित्र रंगीबेरंगी ठिणग्या पडून डोळ्यांचें समाधान व्हावें म्हणून बाणांतील दारूंत आपण धातूंचा बारीक बारीक कीस मिसळतों इतकेंच. जमिनीवरील युद्धांत शत्रुपक्षाच्या प्रांतावर अग्निबाण सोडून त्याच्या मालमत्तेची, सैनिकांची व युद्धासाहित्याची हानि करण्याकडे यांचा उपयोग पंधराव्या शतकापर्यंत केला जात असे; परंतु पुढें पुढें अशा अग्निबाणांचा उपयोग दर्यावरील युद्धांतच विशेष प्रामुख्यानें होऊं लागला. अग्निबाण बनवींत असतांनाच त्याचे स्फोट होऊन मोठमोठे अपघात होत असल्यामुळें या बाणांची निर्मिति मोठ्या प्रमाणावर करण्याला लोक फारसे धजत नसत. औद्योगिक दृष्ट्या मागासलेले देशच अग्निबाणांचा उपयोग युद्धासाठीं करीत असलेले आपल्याला विशेषेंकरून दिसून येतील. कारण उघडच आहे. अग्निबाण तयार करण्यासाठीं मामुली स्वरूपाचा, चार साधीसुधीं हत्यारें असलेला कारखाना पुरेसा होतो. उलट, तोफा व त्यांचे गोळे तयार करावयाचे असल्यास जास्त सुसज्ज व ओतकामाची सांगता असलेला कारखाना तरी हवाच. १९२० सालापूर्वी तयार केल्या जाणाऱ्या अग्निबाणांत स्फोटक पदार्थ म्हणून तोफेंत वापरली जाणारी दारूच उपयोगांत आणीत असत. या दारूंतील वाजवीपेक्षां जास्त असणारा स्फोटकपणा कमी करण्यासाठीं तिच्यात





अनुक्रमणिका

कोळशाची पूड बऱ्याच प्रमाणांत मिसळली जाई. या अग्निबाणांचा आकार रंभाकृति नळकांड्यासारखा असून त्यांत दारू ठांसतेवेळीं मध्यभागीं एक चिंचोळी काडी घालीत असत. नळकांड्यांत दारू ठासून झाल्यावर, मधली काडी काढून घेतली जाई, आणि त्यामुळें मध्यभागीं एक पोकळी आपोआप निर्माण होई. दिवाळींत उडविल्या जाणाऱ्या बाणांप्रमाणें या अग्निबाणांना एक लांब काडी जोडलेली असे. या काडीच्या अभावीं तें ' नळकांडें ' सरळ वर न जातां खालीं डोकें वर पाय अशा स्थितींत धडपडत आलें असतें.

अठराव्या शतकाच्या अखेरीस इंग्लिश तोफखान्यांतलि एक अधिकारी मेजर विल्यम कॉनग्रेव्ह यांनीं अग्निबाणविषयक तंत्रांत सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न केला. अग्निबाण तयार होत असतांना स्फोट होण्याचा धोका नेहमींच असे हें मागें सांगितलेंच आहे. यावर तोड म्हणून कॉनग्रेव्ह यांनीं सुक्या दारूऐवजीं, अलकोहोल-मिश्र दारूचा उपयोग सुचविला. या मिश्रणाचा उपयोग करून तयार केलेला बाण, फेकलेल्या ठिकाणापासून ९०००फूट लांबीचा टप्पा गांठूं शकला. १८०६–७ या सालीं युरोपमध्यें बोलोन व कोपनहेगन या शहरांवर, वरील प्रकारच्या अग्निबाणांचा वर्षाव करून इंग्लंडनें या अस्त्राकडे सर्व देशांतील लष्करी अधिकाऱ्यांचें लक्ष जोरानें वेधून घेतलें. याचा परिणाम म्हणजे पोलंड, फ्रान्स, रशिया इत्यादि देशांत अग्निबाणांच्या निर्मितीबद्दलचे प्रयोग जोरानें सुरू झाले. नेहमींप्रमाणें, इंग्लंडनें या क्षेत्रांत, इतर देशांच्या मानानें आघाडी मारली. विल्यम हेल या इंग्लिश शास्त्रज्ञानें, बाणाला नेहमीं जोडल्या जाणाऱ्या काठीऐवजीं उत्स्रावण (Exhaust) स्थळीं त्रिशुळाकृती धातूचीं पातीं बसविलीं. त्यामुळें अग्निबाणाला चक्राकार गति प्राप्त होऊन उड्डाणांत स्थायित्व (stability) देखील लाभूं शकलें. असे अग्निबाण तयार होऊन कोठारांत कांहीं काळ साठवून ठेवतांच, त्यांतील दारूचें स्थायित्व नष्ट होत असलेलें दिसून येऊं लागलें. चुकून, नकळत असा अग्निबाण हातांतून पडतांच अगर हवेचें उष्णतामान वाढतांच, दारूंत तडे पडून स्फोट व भडका हा बहुतांशीं ठरलेलाच.

पहिल्या महायुद्धांत अशा अग्निबाणांचा उपयोग मोठ्या प्रमाणावर करून फ्रान्सनें जर्मनीच्या आकाशयानावर भडिमार केला होता. येणेंप्रमाणें अग्निबाणविषयक प्रयत्न फार पूर्वीपासून जगांतील निरनिराळ्या देशांत होत होते तरी, शास्त्रीय दृष्ट्या अग्निबाणाचा अभ्यास व त्यावरील संशोधन १९२० नंतरच सुरू झालें असें म्हणावें लागेल. १९२६ मध्यें रॉबर्ट गॉडर्ड या संशोधकानें घनस्वरूपांतील दारूऐवजीं, ज्वलनासाठीं, बाणांत द्रवाची योजना करून, स्वकृत बाण प्रयोगादाखल आकाशांत सोडला. तो बाण सोडलेल्या ठिकाणापासून १८४ फुटांवर जाऊन आदळला. १९३१ च्या मे महिन्यांत, जर्मनींतील अग्निबाणसंशोधनसंस्थेतर्फे जो बाण सोडला गेला तो जमिनीपासून ६० फूट उंचपर्यंत जाऊन परत मातृभूमीस आला. अगदीं अलीकडे म्हणजे दुसऱ्या महायुद्धांत जर्मनीनें "V-2" या नांवानें प्रसिद्धीस पावलेले अग्निबाण तयार करून त्यांचा उपयोग बॉम्बवहातुकीसाठीं व विध्वंसनासाठीं केला हें सर्वांना आठवत असेलच. दुसऱ्या महायुद्धाच्या समाप्तीनंतर, इंग्लंड, रशिया, अमेरिका या देशांचें लक्ष, अतिशय उंचपर्यंत उड्डाण करणाऱ्या अग्निबाणांच्या निर्मितीकडे फार जोरानें वेधलें गेलें. अशा अग्निबाणांचा उपयोग, अणुबॉम्बसारख्या विध्वंसक अस्त्रांचा वर्षाव शत्रुप्रदेशावर किंवा लष्करी मोर्च्यावर करण्याकडे बहुतांशीं त्यांना करावयाचा असेल; कारण फार दूर अंतरावर असलेल्या देशावर अणुबॉंबचा वर्षाव करणें म्हणजे कांहीं सोपें काम नाहीं. कारण स्पष्टच आहे! अणुबॉम्ब वाहून नेणाऱ्या विमानावर, शत्रुरक्षाकडून हल्ला झाल्यास, त्या विमानाची हानि तर होईलच पण शिवाय, आंतील वैमानिकांचे प्राण जाऊन, इच्छित स्थळीं बॉम्ब न पडल्यामुळें, लाखों रुपये खर्च करून तयार केलेला मौल्यवान् अणुबॉम्ब नाहक वाया तर जाणारच. अशा तऱ्हेनें अणुबॉंब फुकट घाल-







थिणें हें लढाऊ राष्ट्रांना कितपत शक्य होईल याची शंका आहे. तेव्हां घरबसल्या नुसती कळ दाबतांच अगर खटका ओढतांच, अग्निबाणाचें ताडकन् उड्डाण होऊन, अल्पावधींतच, शेंकडों मैलांवर असलेल्या शत्रुप्रदेशावर पोहोंचून, बाणाला जोडलेला अणुबॉम्ब शत्रुप्रदेशावर फेंकून तेथें नाश व हाहाःकार उडवून देण्यासाठीं, अग्निबाणाचा उपयोग करतां येईल किंवा नाहीं याचा विचार करण्यांत जगांतील निरनिराळीं राष्ट्रें सध्यां गढून गेलीं आहेत. अग्निबाणविषयक संशोधनांत किती विलक्षण प्रगति अमेरिकेंत सध्यां होत आहे याचें अगदीं ताजें उदाहरण म्हणजे २४ फेब्रुआरी १९४९ या दिवशीं मेक्सिकोंतील व्हाईट सॅन्ड्स मैदानावरून शास्त्रज्ञांनीं उडविलेला एक अग्निबाण होय. अशा अग्निबाणाच्या तोंडाला युद्धकाळांत जोडण्यांत येणाऱ्या बॉंबऐवजीं हवेंतील उंची मोजतां येणारीं यंत्रें बसविलेला एक उपबाण होता. या अग्निबाणानें, जमीन सोडल्यापासून अवघ्या ६॥ मिनिटांतच, आकाशांत २५० मैल उंच उड्डाण करून मग पुढील ५॥ मिनिटांत धाडकन पृथ्वीचा पृष्ठभाग गांठला. यंत्रें बसविलेल्या उपबाणाचा सांगाडा निदान जुलै १९४९ पर्यंत तरी शास्त्रज्ञांना सांपडूं शकला नव्हता.

ज्या तत्त्वावर या अस्त्राची कल्पना आधारलेली आहे तें तत्त्व अगदीं साधें म्हणजे न्यूटनच्या गति-विषयक नियमां( Newton's Laws of Motion ) पैकीं, तिसरा नियम हें होय. "क्रिया व प्रति-क्रिया ही समप्रमाणांत परंतु विरुद्ध दिशेस घडतात" ( Action and reaction are equal and opposite ) हाच तो नियम होय. न्यूटननें हा नियम १६८० च्या सुमारास जगापुढें मांडला. समजा, अग्निबाणाचें वस्तुमान '$\text{म}_1$' व वेग '$\text{व}_1$' आहे आणि उड्डाणसमयीं त्यांमधून बाहेर पडणाऱ्या वायूचें वस्तुमान '$\text{म}_2$' व वेग '$\text{व}_2$' आहे. वर सांगितलेल्या न्यूटनच्या सिद्धांताबरहुकूम $\text{म}_1 \text{व}_1 = \text{म}_2 \text{व}_2$ असें समीकरण मांडतां येतें. उड्डाणसमयीं स्फोटामुळें अग्निबाणांतून निघणारा वायु जर जमि-नीच्या दिशेनें बाहेर पडला तर अर्थात् अग्निबाण आकाशाच्या दिशेनें उडावयास पाहिजे. मुख्य प्रश्न असा उद्भवतो कीं, अतिशय वेगानें बाहेर पडणारा वायु तयार करावयाचा असल्यास कोणतें रासायनिक द्रव्य अग्निबाणांत भरणें श्रेयस्कर होईल? सुप्रसिद्ध रसायनशास्त्रज्ञ आल्फ्रेड नोबल यांनीं शोधून काढलेलीं व सर्व बॉंबमध्यें उपयोगांत आणलीं जाणारीं स्फोटक द्रव्यें नायट्रोसेल्यूलोज व नायट्रोग्लिसरिन यांच्या मिश्रणाचा उपयोग प्रथम अग्निबाणांत इंधन ( Fuel ) म्हणून होऊं लागला. ज्या अग्निबाणांच्या तोंडाला युद्धोपयोगी हत्यार जोडलेलें असतें अशांतील इंधनाचा ज्वलन-काल अंदाजें तीन् सेकंदइतका येतो. या तीन सेकंदांनंतर निर्माण होणारा वायु अर्थात् वेगानें बाहेर पडल्यामुळें, अग्निबाण ताडकन् आकाशांत उड्डाण करतो. अग्निबाणाचा उपयोग युद्धामध्यें, बॉंबफेकीसाठीं करावयाचा असल्यास वर दिलेलीं अगदीं लवकर ज्वलनक्रिया घडवून आणणारीं रसायनें ठीकच आहेत. परंतु इतर उपयोगासाठीं ज्या वेळेस या अस्त्राची योजना करावयाची असते त्या वेळेस मात्र या रसायनाऐवजीं, जरा आस्ते आस्ते व दमादमानें म्हणजे अंदाजें २० ते ३० सेकंदांत ज्वलनक्रिया घडवून आणणारीं द्रव्यें इंधन म्हणून अग्निबाणांत वापरणें अपरिहार्य ठरतें.

कॅलिफोर्निया येथील "जेट प्रॉपल्शन" प्रयोग-शाळेनें कांहीं निराळ्याच रसायनांचीं मिश्रणें सुचविलीं होतीं देखील; परंतु एवढ्यानेंच प्रश्न सुटण्या-सारखा नव्हता. याहिपेक्षां जास्त परिणामकारक व वापरण्यास निर्धास्त असें इंधन जर अग्निबाणा-साठीं मिळालें तर पहावें म्हणून् शास्त्रज्ञांचे प्रयत्न जोरानें सुरूं झाले. वास्तविक १९०३ मध्येंच रशियांतील एक शाळाशिक्षक कॉन्स्टंटिन झिओल्को-व्स्की यांनीं घनस्वरूपांतील भुकटीऐवजीं द्रव अवस्थेंत असणाऱ्या रासायनिक द्रव्यांचा उपयोग अग्निबाणासाठीं करावा असें सुचविलें होतें. परंतु त्यांच्या या नावीन्यपूर्ण सूचनेकडे त्या वेळीं कोणीहि विशेष लक्ष दिलें नाहीं. यानंतर म्हणजे १९१९ मध्यें रॉबर्ट गॉडर्ड यांनीं आपल्या स्मिथसोनिअन अहवालांत अग्निबाणासाठीं द्रवस्वरूपांतील इंधनाचा उपयोग करावा अशी सूचना स्वतंत्रपणें केली. मात्र त्याबद्दल विशेष आग्रह

घरल्यामुळें पुन्हां एकदां त्यांची ही सूचना कागदावरच पडून राहिली. १९२३ मध्यें जर्मनींतील एक गाणितज्ञ हर्मान ओबर्थ यांनीं आपल्या पुस्तकांत अग्निबाणाच्या या आयुधाकडे मापनयंत्रें नेणारें आकाशांतील एक वाहन, किंवा मनुष्यांना घेऊन जाणारें एक प्रवासी हवाई जहाज याच दृष्टिकोनांतून पाहून, मोठ्या हिरीरीनें 'अलकोहॉल व द्रव हायड्रोजन' या द्रव स्वरूपांतील रसायनांची अग्निबाणांतील इंधन म्हणून शिफारस केली व या दोहोंबरोबरच, ज्वलनक्रिया त्वरित घडवून यावी म्हणून द्रव प्राणवायूचा पुरस्कार केला. ओबर्थ यांच्या या सूचनेकडे शास्त्रज्ञांनीं एक अव्यवहार्य सूचना अशा दृष्टीनें प्रथम दुर्लक्ष केलें. खरें पाहिलें असतां ओबर्थ यांच्या या सूचनेमध्यें अतिशय महत्त्वांचा असा गर्भितार्थ दडलेला होता. अग्निबाणांत घनस्वरूपाच्या इंधनाचा उपयोग करण्यामध्यें मुख्य दोष असा होता कीं, एकदां या इंधनाचा भडका उडाला कीं, मग त्यावर ताबा ठेवून ज्वलनाच्या क्रियेवर नियंत्रण घालणें व त्या क्रियेचा वेग पाहिजे तितका कमी-जास्त करणें अशक्य होतें. ही अडचण द्रवस्वरूपांतील इंधन वापरलें असतां निरनिराळ्या झडपा बंद अगर उघड्या करून दूर करतां येतें. द्रव स्वरूपांतील इंधन वापरण्यामुळें आणखी जो महत्त्वाचा फायदा मिळूं शकतो तो म्हणजे अग्निबाणांत इंधन साठविण्यासाठीं उपयोगांत आणल्या जाणाऱ्या टाक्यांच्या भिंती जाड व फार मजबूत असाव्या लागत नाहींत, हा होय. याचे उलट परिस्थिति पावडरवजा घन इंधन वापरलें असतां दिसून येते. घन इंधनाचा भडका उडतांच निर्माण होणारी उष्णता व ज्वलनदाब यांचेपासून योग्य संरक्षण मिळण्यासाठीं इंधनाचा साठा केलेल्या कोठड्यांच्या भिंती अतिशय जाडजूड व मजबूत असाव्या लागतात. भिंतींची जाडी जितकी जास्त तितकें अग्निबाणाचें वजन जास्त आणि त्यामुळें तितकीच त्याची उड्डाणगति मंद. अग्निबाण तयार करीत असतांना यांत्रिक स्वरूपाच्या अडचणी तर अगणित निर्माण होतात, ही गोष्ट देखील विसरतां कामा नये.

इंधनाचा प्रश्न सुटल्यानंतर उद्भवणारा दुसरा प्रश्न म्हणजे इंधन सांठवून ठेवल्या जाणाऱ्या टाक्या कोणत्या धातूपासून बनवाव्यात म्हणजे इंधनाचा भडका उडतेवेळीं निर्माण होणारी प्रचंड उष्णता धोका देणार नाहीं! तोफ उडविली असतां निर्माण होणारी उष्णता ज्याप्रमाणें तोफेच्या पोलादी नळीकडून शोषिली जाते तद्वतच अग्निबाणांतहि उष्णता शोषून घेण्यासाठीं पोलादी टाक्या बनविल्यास चालेल असें कोणालाहि वाटणें साहजिक आहे. परंतु प्रत्यक्षांत मात्र अशा तऱ्हेच्या टाक्यांचा निभाव लागत नाहीं असें दिसून येतें. पोलादाच्या अगदीं उलट म्हणजे ॲल्युमिनिअम या धातूच्या टाक्या बनवून ज्वलनसमयीं निर्माण होणारी उष्णता शोषून टाक्या थंड राहण्यासाठीं त्यांभोंवतीं पाण्याचे प्रवाह खेळवावेत अशी सूचना बऱ्याच जणांनीं केली. केवळ प्रयोगादाखल तयार केलेल्या अग्निबाणांत वरील पद्धतीचा अवलंब करणें जमलें. प्रत्यक्ष उड्डाणासाठीं सोडल्या जाणाऱ्या अग्निबाणांत मात्र तशी व्यवस्था करणें जमेना. उष्णतेवर तोडगा म्हणून टाक्यांमध्यें इतर कोणत्याहि इंधनाऐवजीं अलकोहॉल व पाणी यांचें मिश्रण वापरल्यास, या मिश्रणाकडून ती उष्णता शोषिली जाते असें दिसून आलें. १९३१ मध्यें अशा तऱ्हेचें मिश्रण उपयोगांत आणलेला अग्निबाण तयार केला गेला. जर्मन 'V-2' अग्निबाणांतदेखील ७५ टक्के एथिल अलकोहॉल व २५ टक्के पाणी असें मिश्रण इंधन म्हणून वापरलें होतें असें तज्ज्ञांचें म्हणणें आहे.

अग्निबाणाची रचना, त्यांत उपयोगी पडणारें इंधन, त्यांत ज्वलनसमयीं उत्पन्न होणाऱ्या उष्णतेपासून बचाव, अशा विविध प्रश्नांवर इंग्लंड, अमेरिका, जर्मनी, रशिया इत्यादि राष्ट्रांमध्यें आतापावेतों संशोधन चालू असलेलें दिसून येतें. २४ फेब्रुआरी १९४६ या दिवशीं ज्या अग्निबाणाची उड्डाणचांचणी अमेरिकेंत घेतली गेली तो रंभाकृति असून त्याचें नाकासारखें पुढें आलेलें टोंक शंकू-





अनुक्रमणिका

सारखें (conical) होतें. त्याचा उंची १६ फूट व रुंदी एक फूट होती. त्यांत वापरलेल्या इंधनाचा ज्वलनकाल ३८ सेकंद होता त्या उड्डाणांत या अग्निबाणानें एकूण ४३ मैलांची उंची गांठली. त्याच्या साहाय्यानें उच्च वातावरणांतील थरांसंबंधीं विविध स्वरूपाची शास्त्रीय माहिती मिळूं शकली. कारण त्याच्या नाकामध्यें निरनिराळीं मापन-उपकरणें बसविलीं होतीं. या मापनयंत्रांसह तो परत सुखरूपपणें जमिनीवर यावा यासाठीं त्याला एक छत्री (Parachute) जोडण्याची व्यवस्था केली होती. वातावरण-विषयक शास्त्रीय माहिती मिळविण्यासाठीं धाडल्या जाणाऱ्या अग्निबाणांना परत सुखरूपपणें जमिनीवर उतरविण्यासाठीं अशा छत्र्या जोडतात. असे अग्निबाण जमिनीवरून हवेंत फेंकले जाण्यासाठीं प्रथम त्यांना घन इंधन उपयोग केलेल्या फेकयंत्रा-(Booster) ची मदत देतात. याच्या साहाय्यानें मापन-यंत्रें बसविलेल्या अग्निबाणाला दर सेकंदाला १००० फूट इतका वेग प्राप्त होतो. हा वेग मिळतांच अग्निबाणांतील चलनयंत्र (Motor) चालू होऊन, त्यामधील इंधनाचा भडका साधारणपणें ४५ सेकंदात होतो. त्यामुळें अग्निबाणांचा वेग सेकंदाला १००० फुटापासून सेकंदाला ४१०० फूट इतका वाढतो. असे अग्निबाण वातावरणांत ७० मैल उंचीपर्यंत प्रवास करून खालीं येत असलेले आढळून आले आहेत

'अग्निबाणांच्या साहाय्यानें चंद्र मंगळ आदि ग्रहांवर सफर करणें शक्य होईल काय?' या प्रश्नाकडे सर्वांचें लक्ष वेधलें गेलें आहे. भविष्यकाळाच्या उदरांत काय दडलेलें असेल तें असो बापडें! निदान या क्षणाला तरी वरील प्रश्नाचें उत्तर नकारात्मकच द्यावें लागेल. भविष्यकालांत मात्र या वाहनाचा उपयोग करून चंद्र, मंगळ आदि गोलांवरील सफरीचें स्वप्न सत्यसृष्टींत उतरवितां येईल अशी कित्येक शास्त्रज्ञांना उमेद आहे. अर्थात् चंद्रावर पाऊल टाकल्यावर मनुष्याला जिवंत राहून परत पृथ्वीकडे येतां येईल किंवा नाहीं हें नक्की सांगणें कठिण आहे; कारण चंद्रावर हवा नाहीं. थंडी अतिशय आहे. उलट मंगळावर हवा असली तरी त्यांत कार्बन डायऑक्साइडचा भरणा फार असल्यामुळें तेथें मनुष्याला जगणें अशक्य होईल. या सर्व गोलांवर प्रत्यक्ष पाऊल ठेवल्यावर काय काय अडचणी उद्‌भवतील हा प्रश्न जरी सध्या बाजूला ठेवला तरी या गोलापर्यंतची सफर पूर्ण करतां येईल किंवा नाहीं हाच प्रश्न कित्येकांना भेडसावीत आहे. पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणशक्तीला दाद न देतां चंद्रावर उड्डाण करावयाचें असल्यास वाहनाचा वेग सेकंदाला सात मैलांपेक्षां जास्त असलाच पाहिजे. वातावरणांतून मार्ग काढीत असत वाटेंत लागणाऱ्या प्रचंड उष्णतेमुळें वाहनासकट आपण होरपळून जाऊं त्याला तोड काय? तेव्हां सध्या तरी या अग्निबाणांचा उपयोग वातावरणविषयक संशोधन करण्याकडे होईल असें दिसतें. उच्च वातावरणांत ज्या उंचीवर रबरी फुगे ( Sounding Balloons ), आकाशयानें, पोहोंचूं शकत नाहींत अशा उंचीवरील थरांचें उष्णतामान, घनता, कॉस्मिक किरणांची तेथील विभागणी, तीव्रता, तसेंच त्या उंचीवरील पृथ्वीच्या कर्षुक क्षेत्राची तीव्रता इत्यादि माहिती मिळविणें आणि त्या भागाचीं छायाचित्रें घेणें हीं सर्व कामें अग्निबाणाच्या साहाय्यानें सध्यां करतां येण्यासारखीं आहेत. वातावरणांतील, रेडिओतरंगांच्या वाहतुकीसाठीं निसर्गानें निर्माण केलेल्या छताची, विद्युद्‌विषयक माहिती जमा करणें अग्निबाणाच्या साहाय्यानें शक्य होईल असें दिसतें. अशा तऱ्हेनें मिळविलेली उच्च वातावरणविषयक माहिती केवळ हवामानशास्त्राच्या दृष्टीनेंच महत्त्वाची आहे असें नसून विमानें बांधणाऱ्या यंत्रविशारदांना विमानाची रचना, आकार इत्यादि ठरवितांना ती उपयोगी पडून वेगवान् व प्रचंड विमानांच्या निर्मितीस मदत करूं शकेल.

मागें उल्लेख केल्याप्रमाणें १९४९ च्या फेब्रुवारी महिन्यांत न्यू मेक्सिको ( अमेरिका ) येथून उड्डाण केलेल्या अग्निबाणाची हकीकत ऐकल्यावर चंद्र-मंगळादि आकाशस्थ गोलांवर सत्ता प्रस्थापित करण्याचें स्वप्न बऱ्याच कालांतरानें कां होईना, पण खरें ठरणें शक्य आहे अशी आशा वाटूं

लागतें. एका अजस्र अग्निबाणाला, दुसरा छोटेखानी अग्निबाण जोडून एकाच उड्डाणांत जरी नाहीं, तरी टप्प्याटप्प्यानें कां होईना, वातावरणांत निरनिराळ्या उंचीवर जाऊन, अखेर तिसऱ्या अगर चवथ्या टप्प्यांत पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणकक्षेबाहेर गेल्यामुळें चंद्रावर पाऊल ठेवणें शक्य होईल अशी कल्पना कित्येक-वेळां डोकावूं लागते. मात्र हा लांबवरचा प्रवास करतांना वाटेंत विश्रांतिस्थानांची व इंधन-पुरवठा करणाऱ्या स्थानकां( station )ची गरजहि भासणारच. शास्त्रज्ञांना अशी उमेद आहे कीं पृथ्वीवरील निरनिराळ्या रेल्वेमार्गावर असणाऱ्या स्थानकांप्रमाणें, आकाशांत फिरतीं स्थानकें घिरट्या घालीत ठेवतां येतील. अशा फिरत्या स्थानकांमधून नवे नवे अग्निबाण, उच्च वातावरणांत सोडणें शक्य होईल, अशी शास्त्रज्ञांची कल्पना आहे. अशा फिरत्या स्थानकांत माणसें ठेवल्यास, पृथ्वी-चंद्र पृथ्वी-मंगळ या प्रवासावर निघालेल्या अग्निबाणांना इंधन, पाणी-पुरवठा करणारीं विश्रांतिगृहें, एवढेंच त्यांचें स्वरूप मर्यादित न राहतां, वातावरणांतील निरनिराळ्या उंचीवरील प्रयोगशाळा व वेधशाळा असा त्यांचा उपयोग करणें शक्य होईल अशी कल्पना कोणी काढल्यास ती चूक होईल काय !

अग्निबाणाच्या साहाय्यानें आकाशांत शिडी उभारण्याचें स्वप्न म्हणजे सध्या तरी निव्वळ कवि-कल्पनाच असें वाटूं लागतें. परंतु अणुशक्तीच्या या युगांत, ही कल्पना सत्यसृष्टींत उतरविणें अशक्य होईल असें, भौतिक शास्त्रांत झपाट्यानें होत असलेल्या प्रगतीकडे पाहिल्यानंतर, कोण बरें म्हणेल !

---

## व्यक्ति, कुटुंब आणि समाज

सुमारें २५ वर्षांपूर्वी एक इंग्लिश जीवशास्त्रज्ञ स्कॉट वुइलिअमसन यानें रोगोत्पादन करण्याचा प्रयोग करण्याच्या हेतूनें उंदरांच्या कुटुंबांच्या एका वसाहतीवर रोगजंतू शिंपडून पाहिले. परंतु त्याचा प्रयत्न यशस्वी झाला नाहीं. उंदरांच्या कुटुंबांनीं त्या रोगजंतूंचा यशस्वी प्रतिकार केला. नंतर वुइलिअमसननें कांहीं नर उंदीर त्यांच्या कुटुंबापासून व वसाहतीपासून विभक्त करून त्या उंदरांवर रोगजंतू सोडले. त्याला आढळून आलें कीं या कुटुंबापासून विभक्त झालेल्या सड्या उंदिरांची रोगप्रतिकारक शक्ति कमी झाली आणि ते रोगाला बळी पडले. या योगानें वुइलिअमसनला संशोधनाकरितां नवीन प्रमेय सांपडलें; माणसांतहि कुटुंबें मोडून वाताहत होते. मग माणसांत जे रोग व आजार उद्‌भवतात त्यालाहि कुटुंबांची वाताहत कोठपर्यंत कारण आहे ! या त्याच्या संशोधनामधूनच एक नवीन संस्था १९२६ सालीं जन्मास आली. ती लंडनमधील 'पेकहॅम प्रयोगसंस्था'.

या पेकहॅम संस्थेच एक 'आरोग्यकेंद्र' ( पायोनिअर हेल्थ सेंटर ) असून त्या केंद्राचे सभासद फक्त कुटुंबालाच होतां येतें, व्यक्तीला नव्हे. त्या केंद्राचे असे कुटुंबसदस्य ६०० आहेत.

आपल्या संशोधनाचा किमान विषय व्यक्ति न धरतां कुटुंबच धरण्याचा हेतु विशद करतांना वुइलिअमसन म्हणताल : "आरोग्य-केंद्र म्हणजे कुटुंबांचा समाज पाहिजे; तरच जीवनप्रवाहा(Life process)चा जीवशास्त्रीय दृष्ट्या तर्कशुद्ध अभ्यास करतां येईल. आपण जर केवळ एका व्यक्तीचेंच निरीक्षण आणि संशोधन करूं लागलों, तर ती व्यक्ति दिवसेंदिवस अगदीं गर्भावस्थेपासूनच अधिकाधिक जीर्ण ( older ) होत जात असते, तिच्यांत खरें सातत्य नसतें असें आढळून येतें. कुटुंबांत मात्र हें सातत्य असतें आणि कुटुंब सदैव तरुण वर्धिष्णु असतें." संततीमुळेंच व्यक्तीची वाढ परिपूर्ण होते, नर हा मानव बनतो आणि मादी ही मानवी बनते. अपत्यामुळेंच समाजांत नवजीवनाचा आविष्कार होऊन समाजाला विविधता येते."

—संडे न्यूज ऑफ इंडिया, ( ५–३–१९५० ) वरून





अनुक्रमणिका

प्रा. त्र्यंबक शंकर शेजवलकर

# हिंदुस्थानांतील सर्वांत मागसलेला प्रांत !

इंग्रजांनीं हिंदुस्थान जिंकलें तें काहीं इतिहासकारांच्या मताप्रमाणें आपण काय करतों या गोष्टीचें भान नसतांना केलेली गोष्ट असो किंवा त्यांनीं तें विचारपूर्वक कारस्थानपरंपरा रचून घशांत घातलेलें असो, आपल्या राज्याचे प्रांत बनवितांना त्यांनीं ते आपल्या त्या त्या काळच्या सोयीप्रमाणें पाडले हें निश्चित आहे. त्यामुळें वेगवेगळ्या भाषा व भिन्न भिन्न संस्कृति असणाऱ्या प्रांतांचे तुकडे काहीं ठिकाणीं एका प्रांतांत समाविष्ट झाले. या गोष्टीचा परिणाम काहीं भाषिकांना फायदेशीर तर इतरांना तोट्याचा झाला व कित्येकांचें तर स्वतंत्र अस्तित्व शिल्लक राहतें कीं नाहीं, याचीच भ्रांत पडली. मद्रास प्रांतांत तमिळ भाषेबरोबर मलियाळी, कानडी व तेलुगु या द्राविडीच काय, पण उडिया या तद्बाह्य भाषेचाहि काहीं भाग सामील केला गेला. त्याचा फायदा ताम्मिळ म्हणजे मुख्य द्राविड भाषिकांना सर्वांत जास्त झाला. आज आपण ज्यांना मद्रासी म्हणून ओळखतों ते बहुधा हेच लोक असतात. यामुळें तेलुगु व कन्नड भाषा बोलणारांची पुष्कळच कुचंबणा झाली. त्यांतहि मैसूरचें प्रागतिक राज्य अस्तित्वांत आल्यामुळें कानडी भाषिकांची काहीं सोय लागली; पण तेलुगूंचा अर्धा प्रांत निजामाच्या उर्दू संसारांत गेल्यामुळें व बाकीच्या अर्ध्यांवर ताम्मिळांचें सर्वच बाजूंनीं आक्रमण झाल्यामुळें त्यांची स्थिति केवळ शोचनीय बनली. वस्तुतः इंग्रजांच्या राज्यांत, पूर्वी जेते असलेल्या लोकांची गळचेपी झाली व जे काहीं बंगाल्यांप्रमाणें किंवा द्राविडांप्रमाणें दासवृत्ति बनून गेले होते, त्यांची भरभराट झाली. विजयनगरचें साम्राज्य व त्याचे पुढील अवशेष म्हणून स्वतंत्रपणें शिल्लक राहिलेले नायक हे बहुधा तेलुगु वा कानडी लढाऊ वर्गांचे होते. पण पुढील राज्यांत सगळे अय्यर, अय्यंगार, पिल्ले, मुदलियार पुढें आले. विसाव्या शतकाच्या आरंभीं हिंदुस्थानांत जुन्या इतिहासाचें राष्ट्रीय अभिमान म्हणून पुनरुज्जीवन झालें, तेव्हांपासून वेगवेगळे भाषिक आपल्या जुन्या इतिहासाच्या आधारावर आपली संघटना करूं लागले. पुढें काँग्रेसनें व त्या अनुरोधानें ब्रिटिश सरकारनें एकभाषिकांचा स्वतंत्र प्रांत करावा ही कल्पना अंमलांत आणली. काँग्रेसनें लोकांच्या स्वाभिमानपूर्तीसाठीं जी गोष्ट मंजूर ठरविली, तिचा इंग्रजांनीं मात्र आपल्या फायद्यासाठीं व संरक्षणासाठीं मोर्चे बांधण्यासारखा उपयोग केला. बंगाल्यांची चळवळ बोचक झाली, तिला मोडून काढण्यासाठीं प्रथम बंगालची फाळणी व ती परत घेतल्यावर आसाम, बिहार व ओरिसा यांचे स्वतंत्र प्रांत घडविण्यांत आले. मागसलेल्यांना आपल्या हाताशीं धरून, पुढारलेल्यांना तोंड देण्याचा किंवा त्यांची शक्ति खची करण्याचा इंग्रज सरकारचा प्रयत्न त्यांना चांगलाच फायदेशीर झाला. बंगाली लोकांचें राजकारणांतील प्रामुख्य त्यामुळें क्रमशः कमी कमी होत गेलें. त्यासाठींच राजधानी दिल्लीला बदलण्यांत आली. या गोष्टींचे परिणाम काय होतील याचा, चाळीस वर्षांपूर्वीच्या हिंदी देशभक्तांना अंदाज झालेला दिसत नाहीं. यामुळेंच त्यांनीं पुढें सिंध व सरहद्द प्रांत आणि बलुचिस्थान अलग करण्यास अडथळा केला नाहीं. पाकिस्तानच्या निर्मितीस हें एक कारण आहे, हें इतिहासकारास विसरतां येणार नाहीं.

# हिंदुस्थानांतील सर्वांत मागसलेला प्रांत !

## तिभंगलेला ओढिसा !

इंग्रज सरकारच्या व कॉंग्रेसच्याहि याबाबतच्या वागण्यांत सुसूत्रता नव्हती. बंगालची फाळणी इंग्रजांना रद्द करावी लागली तरी त्यांनी महाराष्ट्र दुभंगलेलाच ठेवला. प्रथम संस्कृतोद्भव बिहारी व मैथिली भाषेचा प्रदेश ओरिसा या बहुसंख्य वन्य भाषा बोलणारांच्या जंगली टापूशीं संलग्न करण्यांत आला. वस्तुतः जुना ऐतिहासिक ओढिसा हा मूलतःच तिभंगलेला होता व इंग्रजांच्या राज्यांतहि तो तिभंगलेलाच राहिला. उत्कल, ओड्र व कलिंग अशीं तीन देशनामें प्राचीन काळीं या प्रदेशाला होतीं. यांपैकीं कलिंगाचा बराच भाग आतां तेलिंगाणांत गेला आहे व अगदीं थोडा दक्षिणेकडील आजच्या ओरिसांत सामील झाला आहे. आजचा ओढिसा मुख्यतः ओड्र देश आहे. त्याच्या ईशान्येकडील उत्कल हा बराचसा आतां बंगाल्यांत मिळून गेला आहे. मेदिनीपूर हा जिल्हा मूळचा उत्कलाचाच भाग होता; पण बंगाल्यांनीं पुढें पुढें वसाहत करीत येऊन तो आत्मसात् केला आहे. मध्यंतरीं पन्नास—साठ वर्षें मराठ्यांच्या, म्हणजेच नागपूरकर भोसल्यांच्या ताब्यांत राहिल्यानंतर ओढिसा इंग्रजांनीं व्यापला, तेव्हां ईस्ट इंडिया कंपनीच्या इंग्रजी भाषेंत प्रवीण झालेल्या बंगाली सरकारकुनांनीं ओढिसांतील जमीनदारांस व लोकांस इतकें फसविलें कीं, कायदेशीर लुच्चेगिरी करून ओढिसांतील बहुतेक सुपीक जमिनी, त्यांनीं मातीमोल किंमतीला लिलांव करवून आपल्या नांवावर चढवून घेतल्या. या लोकांचेच वंशज आजचे ओढिसांत सुखी, सुशिक्षित, पुढारलेले व अधिकारसंपन्न आहेत. मात्र त्यांच्या बंगाली भाषेचें स्तोम आतां मागें पडून, त्यांना उडिया ही स्थानिक भाषा स्वीकारावी लागली आहे. आजवर ओढिसा हा, हिंदुस्थानांतील सर्व सुशिक्षित व पुढारलेले लोकच काय, पण स्थानिक उडिया लोकहि अत्यंत मागसलेला समजत असत. कारण त्यांपैकीं कित्येक दाक्षिणेकडील तेलुगु भाषेच्या कचाट्यांत सांपडले होते. संबळपुरचे लोक मध्यप्रांतांत गेल्यामुळें नागपुरशीं जोडले गेले होते. काहीं पटण्याला प्रांताची राजधानी झाल्यामुळें बिहारीच्या कक्षेंत आले होते; व उत्तरेकडील बहुसंख्य बंगालीच्या साम्राज्यांत प्रविष्ट झाले होते. ज्याप्रमाणें मुंबईला कोंकणांतलि हुषार, स्वच्छ व कामसू कुणबी हे गुजरात्यांचे बाल्ये वा त्यांच्या गिरणींतील मजूर—गडी होऊन राहिलेले दृष्टीस पडतात, त्याप्रमाणें कलकत्त्यांत उडियाभाषिक झालेला दृष्टीस पडतो. त्यांच्यांतील पांढरपेशे ब्राह्मणादि वर्गहि आचारी, पाणक्ये, खटपटी, हॉटेलवाले बनून गेलेले दिसतात. त्या मानानें मुंबईतील महाराष्ट्रीय ब्राह्मणवर्ग निदान हलका कां होईना, पण कारकून तरी असलेला दृष्टीस पडतो. केवळ ऐतिहासिक आधारावर पाहिलें तर आजचा ओढिसा प्रांत हा अगदीं अशोकाच्या वेळेपासून पुढारलेला होता असें दिसतें. तेथें अशोकाचे व त्यानंतरच्या खारवेलाचे शिलालेख आहेत, खडकांत कोरलेल्या गुंफा आहेत, व मुसलमानपूर्व काळांतील चौदाव्या शतकापर्यंत बांधलेलीं प्रचंड देवळेंहि अस्तित्वांत आहेत. ओढिसा हा हिंदुस्थानांतील अगदीं अखेरीस मुसलमानांच्या ताब्यांत गेलेला—म्हणजेच अखेरपर्यंत आपलें स्वातंत्र्य टिकवून राहिलेला—प्रांत होय हें इतिहासज्ञांस सांगणें नलगे.

## उज्ज्वल आर्थिक भवितव्य

एवंगुणविशिष्ट असा हा प्रांत आतां सलग व स्वतंत्र होऊन एका राजवटीखालीं आला आहे. उत्तरेस संबळपूरपासून दाक्षिणेस गंजामपर्यंत सर्व जुन्या जंगली व मागासलेल्या संस्थानांसहित प्रदेशांत आतां उडिया ही स्थानिक राजभाषा प्रचलित केली जात आहे. वस्तुतः हा भाग सर्वच दृष्टींनीं अगदीं मागसलेला आहे, पण मागसलेपणाचे कांहीं फायदेहि सध्यां त्याला मिळण्यासारखे आहेत. महानदीसारखी मोठी नदी या प्रदेशांतून वहात असून तिच्या धरणांच्या जोरावर नवीन शेती व वीजहि उत्पन्न करणें शक्य होणार आहे. कोळसा आदि खनिज पदार्थहि या प्रदेशांत आहेत. खेरीज जंगली लांकूड व इतर उत्पन्नहि त्याला येतीं ५० वर्षें पुरण्यासारखें आहे. सध्यां ओढिसांत दाक्षिणेकडील समुद्रकांठचे तीन जिल्हे प्रमुख व पुढारलेले आहेत. पुढें कदाचित विजेमुळें व कालव्यांखालील शेतीमुळें








संबळपुराकडील प्रदेश व कोळशांच्या खाणीचा प्रदेश जास्त पुढारलेला व सुखी होण्याचा संभव आहे. या प्रांताला समुद्रकांठ लाभूनहि उत्तम बंदरांची सोय नाहीं. कारण, किनारा वाळवंटी, सखल पाण्याचा व अतिवादळांनीं व्याप्त असा आहे. खेरीज इंग्रज सरकारनें दक्षिणेस थोडयाच अंतरावर विशाखापट्टण (ज्याला विजगापट्टण म्हणतात तें) हें नवें आधुनिक सोयींनीं युक्त असें बंदर रेल्वे जोडून वाढविलें आहे, तें नव्या आंध्र प्रांतांत जाणार आहे. ओढिसाला बहुधा याच बंदरावर, किंवा ईशान्येकडील कलकत्त्यावर अवलंबून रहावें लागेल. नवीन रेल्वेरस्ते जंगलांतील प्रदेशांतून या बंदरांस जोडावे लागतील. आर्थिकदृष्टया ओढिसा हा पुढें येऊं घातलेला प्रांत आहे.

दळणवळणाच्या दृष्टीनें दूरचा व अडचणीचा असा हा प्रदेश असल्यामुळें, हिंदुस्थानच्या इतर भागांतील प्रवासी या प्रदेशांत क्वचितच जातात. कलकत्त्यास राजधानी असेपर्यंत, मद्रासेकडील लोक पूर्वकिनाऱ्यानें या प्रदेशांतून जात. पण इतरांना या प्रदेशाकडे पहाण्याचें फारसें कारण पडत नसे. याला अपवाद फक्त जगन्नाथपुरीचा. हें चार धामांपैकीं पूर्वेकडील धाम समजलें गेलें असल्यानें येथें परप्रांतातील हिंदू यात्रेकरू बरेच येतात. पण त्यांतहि मुख्य भरणा बंगाली लोकांचाच असतो. चैतन्याच्या काळापासून पुरी हें बंगाली लोकांचें मुख्य क्षेत्र बनून राहिलें आहे. आजहि या प्रदेशांतील आगगाडीचें दळणवळण, पुरी हें केंद्र धरून हावड्याशीं (हावरा नव्हे) जोडलेलें आहे. याच्या वाटेवर कटक राजधानी लागते एवढेंच. नवी होऊं घातलेली राजधानी भुवनेश्वर हीसुद्धां याच मार्गावर कटकच्या थोडी दक्षिणेस आहे. आजची राजधानी कटक—म्हणजे मूळ अर्थानें शिबिर ऊर्फ कॅंप—ही महानदीच्या दोन फाट्यांच्या बेळक्यांत वाळवंटी प्रदेशांत वसलेल्या द्वीपकल्पांत पसरलेली आहे. पावसाळ्याच्या चार महिन्यांत रक्षण करण्यास तो फार सोयीची जागा होती. मैल मैल रुंदीचे पाणी ओलांडल्याशिवाय कटकला पोंचणें शक्य नव्हतें. आतां कालव्यांनीं पाणी दुसरीकडे वळविल्यामुळें, बहुधा नदीचें वाळवंटच पहावयास शिल्लक आहे. उत्तरेकडील महानदीच्या मुख्य पात्रांत डोहांमुळें बरेंच पाणी दिसतें. पण दक्षिणेकडील काटजुरीच्या पात्रांत एखाद्या वहाळाएवढेंच पाणी सध्यां वहातांना दृष्टीस पडतें. कालव्यांतून मात्र सतत पाणी वहात असल्यामुळें, त्यांतून नौका शिडांच्या साहाय्यानें चालतांना दृष्टीस पडतात. स्थानिक व्यापार बहुधा या जलमार्गानेंच चालतो. महानदी अनेक मुखांनीं व फाट्यांनीं सागरास मिळाली आहे. तसेंच सुवर्णरेखा, वैतरणी, ब्राम्हणी वगैरे दुसऱ्या बऱ्याच मोठ्या नद्या, कटकच्या ईशान्येकडील प्रदेशांतून वहात जाऊन समुद्राला मिळतात. दक्षिण ओरिसांत समुद्राकिनाऱ्यालगत चिल्का हें खाऱ्या पाण्याचें व समुद्राशीं लहान तोंडानें जोडलेलें असें विस्तृत सरोवर, खूप लांबलचक पसरलेलें आहे. या सर्व जलमार्गांनीं ओरिसाला कोंकणाप्रमाणें खाड्यांच्या व तारवांच्या प्रदेशाचें स्वरूप प्राप्त झालेलें आहे.

## पूर्वकिनाऱ्यावरील कोंकण

आणि समुद्राकिनाऱ्यावरील ओढिसांचा भाग हा बऱ्हंशीं इकडील कोंकणासारखाच आहे. हें साम्य सर्वच बाबतींत कमी-जास्त प्रमाणांत दृष्टीस पडतें. येथें रत्नागिरी जिल्ह्याप्रमाणें जांभा दगड व तांबडमातीचे डोंगर आहेत तसेंच ठाणें जिल्ह्यांतील वाळवंटी प्रदेशाप्रमाणें सखल ताडांनीं भरलेले भातशेतीचे प्रदेश आहेत. समुद्राच्या आंत येणाऱ्या फाट्यांना बांध घालून त्याचीं खाजणें तयार केलेलीं आहेत. मुख्य उत्पन्न भात पण रत्नागिरी जिल्ह्यांप्रमाणें कुळीथ व उडीद, तसेंच कुलाबा जिल्ह्याप्रमाणें वाल हीं कडधान्येंहि येथें पिकतात. मात्र इकडे कुळीथ जनावरांचें खाद्य आहे, माणसांचें नव्हे. गायी, बैल, म्हैशी, रेडे हेच काय, पण शेळ्या-मेंढ्या हीं जनावरें सुद्धां लहान आकाराचीं दृष्टीस पडतात. म्हणजे हा गुरचराईचा किंवा लोंकरीचा प्रदेश नव्हे हें उघड झालें. कोंकणाशीं इतर साम्य म्हणजे आंबा, फणस नारळ, केळीं, काजू, बांबू हींच काय, पण ज्याच्या कठिण कवचीच्या कडू फळांपासून दक्षिण कोंकणांत व कानडा प्रदेशांत दिव्याचें





अनुक्रमणिका

फळू तेल काढतात, तीं उंडलीचीं ( संस्कृत नांव पुन्नाग ) झाडेंहि इकडे, मुद्दाम राया राखून वाढविलेलीं दिसलीं. यावरून स्थानिक मूळचें दिवेल याच तेलाचें आहे हें स्पष्ट झालें. मोटारींनीं प्रवास करतांना दोन्हीं बाजूंस सखल भातखाचरें व मधून मुद्दाम माती खणून टाकून उंच केलेले रस्ते हाच प्रकार सर्वत्र दिसतो. या रस्त्याच्या बाजूला केतकी कुंपणासारख्या स्वाभाविक वाढलेल्या दृष्टीस पडतात. अनेक ठिकाणीं तांबडीं कमळें फुललेलीं तळीं—अर्थात् बांधलेलीं नव्हत, तर निसर्गनिर्मित—जागोजाग लागतात. गांववस्ती बहुधा झांडी असलेल्या ठिकाणीं असावयाची. समुद्रकिनाऱ्याला, विशेषतः चिल्का सरोवराच्या परिसरांत, मिठागरें व मच्छीमारी हीं सर्वत्र चालू आहेत व बहुतेक लोक—फक्त वैष्णवांखेरीज—मत्स्याहारी आहेत. लोक कोंकणांतल्याप्रमाणें बरेचसे उघडेवागडे, वस्त्र शक्य तितकें कमी वापरणारे, असेच दिसले व तेथील हवेंत वस्त्राची जरूरीहि फारशी नसावी. पानसुपारी खाणें हें व्यसन सार्वत्रिक. जगन्नाथाच्या महाप्रसादांतहि पानावर मिठाबरोबर हिरवी मिरची वाढण्याचा प्रकार आहे; यावरून मिरची चावल्याशिवाय जेवण जात नाहीं असें असणारे कोंकणांत जसे अनेक लोक आहेत, तोच प्रकार ओढिसांत दिसतो. लोकांची रीतभात, खेडेगांवांतील घरांची ठेवण, व उडिया भाषाहि, कोंकणी वाटते. अनेक वाक्यें व शब्दप्रयोग शुद्ध मराठी भासतात. एवंच, हा प्रांत म्हणजे पूर्व किनाऱ्यावरील कोंकण म्हणण्यास हरकत नाहीं.

## गोपबंधूंचे शिष्य हरेकृष्ण महताब

या प्रांताला पुढें आणणाऱ्यांत गोपबंधु दास यांचें नांव आरंभीं घालावें लागेल. यांनीं महात्माजींचें अनुयायित्व पत्करून ओढिसाला काँग्रेसमध्यें प्रतिष्ठा मिळवून दिली. राजकारणासाठीं म्हणून नव्हे तर अंगभूत निष्ठेनेंच ते स्वयंभू गांधीवादी होते. आपल्या हीनदीन झालेल्या बांधवांबद्दल पराकाष्ठेचें प्रेम व सेवावृत्ति त्यांनीं दाखवून या भाचारी, पाणकये, बाल्ये लोकांच्या प्रदेशात ..ाची जाणीव आणली. हे इतके गरिबीनें रहात कीं एकदां सी. एफ अँड्र्यूज त्यांच्याकडे पाहुणे म्हणून गेले असतांना त्यांची स्थिति पाहून त्यांच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले व या गोष्टींचें वर्णन त्यांनीं एक स्वतंत्र लेख मुद्दाम लिहून 'मॉडर्न रिव्ह्यू'च्या एका अंकांत केलें आहे. गोपबंधु अक्षरशः आपला देह देशसेवेंत झिजवून वारले. त्यांच्याविषयींच्या कृतज्ञताबुद्धीनें आजच्या ओढिसानें त्यांचें स्मारक एक संगमरवरी पुतळा जगन्नाथाच्या देवळाच्या महाद्वाराजवळील अफाट चौकांत स्थापून कृतज्ञतेनें सर्व यात्रेकरूंच्या नजरेस येईल असें करून ठेवलें आहे. यांच्या तालमींत तयार झालेले हरेकृष्ण महताब हे आतां ओढिसाचे मुख्य प्रधान व सर्व दृष्टींनीं पुढारी बनलेले आहेत. आजच्या हिंदुस्थानांत सर्वच प्रांतांत काँग्रेस पुढारी प्रधान झालेले असले तरी हरेकृष्णाचा नंबर त्यांच्यांतहि वर लावावा लागेल. एक सरहद्द-गांधी सोडले तर सगळा दिवस सारखें कोठलें ना कोठलें काम अंगानें करीत रहाणारा महताबांसारखा पुढारी क्वचितच दिसतो. यांना 'स्वस्थ बसा' म्हणून सांगणें ही शिक्षा. 'काम करा' हें सांगण्याची गरजच नाहीं. आपल्या मोठेपणाचा आव नाहीं, गर्व नाहीं ( याचा अर्थ जाणीव नाहीं असा नव्हे ), लहानमोठेपणाचा भेद नाहीं व नोकराला हाक मारण्याऐवजीं स्वतः ताडकन उठून धांवत जाऊन काम करण्याची वृत्ति असा यांचा पेशा आहे. हे जातीनें राजपूत असून मूळ या प्रदेशांतील नव्हत. बरद्वानच्या महाराजांशीं यांचा संबंध आहे, पण आपल्या या दत्तक मातृभूमींत त्यांनीं आपलें मन व हृदय सर्वस्वीं गुंतविलें आहे. कार्यकर्ता असूनहि विद्याभिलाषी, राजकारणी असूनहि संशोधक, स्वतः साधे राहूनहि आतिथ्यप्रसंगीं मुक्तहस्त, असें विरळ एकत्र दिसणारें दृश्य यांच्या ठायीं दिसतें. वयानें पन्नाशी होऊनहि यांची प्रकृति कार्यदृष्ट्या आजहि तिशीच्या माणसाची दिसते. यांनीं ओढिसाच्या इतिहासावर तीन व्याख्यानें लखनौ विद्यापीठापुढें दिलीं, तीं त्या विद्यापीठानें 'ओढिसाचा इतिहास' म्हणून इंग्रजींत ग्रंथरूपानें प्रसिद्ध केलीं आहेत. स्थानिक इतिहासाचें व समाजाचें त्यांनीं खूप सूक्ष्म अध्ययन केलेलें दिसतें. पुरीच्या जगन्नाथाचा

पंथ कसा निर्माण झाला, इतर पंथांहून त्याचें वैशिष्ट्य काय, जगन्नाथाच्या देवळांतील मूर्ती जगन्नाथ, बळराम व सुभद्रा अशा बहीण-भावंडांच्या, लांकडी व विद्रूप कां-या गोष्टींचें-हि मार्मिक संशोधन त्यांनी करून त्यावर एक पुस्तिका प्रसिद्ध केली आहे. आजवर झालें तें गेलें, पण यापुढें आपला छोटा प्रांत कोणत्याहि बाबतींत मागें म्हणून राहूं द्यावयाचा नाहीं, असा त्यांनी निश्चय केलेला दिसतो व आश्चर्य असें कीं, सर्व उडिया लोकांत त्यांनीं या गोष्टीचा संचार करविलेला दिसतो. याचा अनुभव 'हिस्टॉरिकल रेकॉर्डस' कमिशनच्या निमित्तानें कटकला गेलेल्यास सर्वत्र आला. तिगरता दिल्लीला झालेल्या बैठकींत स्वागत व व्यवस्था ठीक होती, पण स्वयंसेवक असा कोणीच पाहुण्यांची चौकशी करण्यास येतांना आढळला नाहीं. याउलट ओडिसांत सर्वत्र स्वयंसेवकांची अहमहमिका सभारुदांपुढें सतत दिसली. पुढारलेल्या पाहुण्यांच्या दृष्टीनें आपलें कोठें व्यंग दिसतें कीं काय याचीच भीति सर्वांना वाटत असावी. खरी स्थिति अशी कीं लोकांच्या व सरकारच्या साहाय्यानें सर्वच स्वागत थाटाचें झालें.

## हिंदु संस्कृतीचें एक अजबघर

उडिया लोकांत द्राविड व त्याहूनहि जास्त इतर वन्य जातींच्या रक्ताची बरीच भेसळ झालेली चेहरे तपासून पहाणारास दिसते. लोक बहुसंख्य काळे म्हटले तरी, कांहीं जातींत पुरे गोरेहि दिसतात. या लोकांचीं मनें अजून सुधारणेनें मलिन झालीं नाहींत. तीं अजून बालसदृश स्वच्छ दिसतात. (असाच अनुभव याहूनहि जास्त प्रमाणांत सायब्येकडील पठाणांत येतो.) यावर बंगाली लोकांची छाप सर्वांत जास्त पडली. उलट असें वाटतें कीं, यांच्या श्रद्धामयतेची छाप बंगाल्यावर पडली असावी. आजच्या ओडिसांतील पांढरपेशा जाती, किंबहुना वन्य लोकहि बौद्ध व जैन पंथांच्या आचारांतून व विचारांतून अगदीं आरंभींच बुडून बाहेर पडलेले आहेत. त्या पंथांच्या कांहीं वैशिष्ट्यांची छाप या समाजावर आजहि आहे. जगन्नाथाचा पंथ हा या पायांतून निर्माण होऊन त्याला पुढें ब्राह्मणी संस्कृतीचें पुट देण्यांत आलेले आहे. यांत जातिभेद, सोंवळें-ओवळें, अन्नोदकव्यवहारांच्या बाबत वेगळेपणा फारच थोडा आहे. शिजविलेलें अन्न खरकटें न समजतां सगळीकडे फिरूं शकतें. तें अन्यस्पर्शानें भ्रष्ट होतांना दिसत नाहीं. मडक्यांतून विशिष्ट पद्धतीनें शिजविलेला भात हाच जगन्नाथाचा मुख्य प्रसाद हा वाटेल तितका विकण्यांत येतो. जगन्नाथाच्या मूर्ती नेहमीं ब्राम्हणांच्या ताब्यांत असतात; तरी मुख्य उत्सवाच्या व यात्रेच्या महिन्यांत त्या स्थानिक अस्पृश्यांच्या स्वाधीन असतात! या गोष्टीचा सामाजिक अर्थ काय हा विचारणीय प्रश्न आहे. असें दिसतें कीं, मूळ अनार्य दैवतें बौद्धांच्या त्रिरत्नांच्या कक्षेंत आलीं व नंतर फिरून ब्राह्मणी संस्कृतीची छाप पडल्यावर त्यांना कृष्णपूजेचें स्वरूप देण्यांत आलें. पण समझोता म्हणून मूळच्या लोकांचा हक्क व पद्धति कांहीं दिवसांपुरती जिवंत ठेवण्यास मोकळीक देण्यांत आली. जगन्नाथाच्या तीन मूर्ती लांकडाच्या असून त्या बारा वर्षांनीं नित्य स्नानादिकांनीं खराब झाल्यानंतर, पुजारे त्या भक्तांना न कळूं देतां गुपचूप बदलून, त्या जागीं मुळाबरहुकूम बनविलेल्या नवीन मूर्ती स्थापन करतात. कदाचित् त्या मूळच्या वन्य लोकांच्या स्वपंथानिदर्शक किंवा जातिनिदर्शक पशुपक्ष्यादिकांच्या आकृती असतील. यापैकीं नाग लोकांचा नाग अखिल हिंदुस्थानभर ब्राह्मणी संस्कृतींत समाविष्ट झाला, हत्तीचें चिन्ह गणपतिरूपानें सर्वांचेंच विघ्नहर्ते साधन बनलें. विशिष्ट देवांना प्रिय अशीं विशिष्ट पत्रपुष्पें मानण्याचा प्रघातहि याच मुळांतून संस्कृतीस चिकटला. अनेक मूळ स्वतंत्र पंथानिदर्शकांचा ब्राह्मणी संस्कृतींतील दैवतांशीं पुढें अभेदरूप एकंकार करण्यांत आला. हिंदु संस्कृति म्हणजे अशा अठरा धान्यांचें कडबोळें होय. आजहि हे थर सूक्ष्म पहाणारास सर्वत्र पसरलेले दिसतात. जगन्नाथाचें मंदिर व पंथ हा याचें एक अजबघरच होय.

## हिंदु स्थापत्यशास्त्राची परिसीमा

ओडिसांत धवलीला अशोकाचें बौद्धशासन शिलानिविष्ट आहे. त्याप्रमाणेंच खारवेलाच्या जैन

पंथाचें प्रदर्शन उदयगिरि–खंडगिरि येथील कोरीव लेण्यांत दृष्टीस पडतें. तेथून थोड्या अंतरावर मध्ययुगांतील राजधानी जी भुवनेश्वर तिचें विस्तीर्ण क्षेत्र पसरलेलें आहे. मुसलमानांचा धुडगूस होऊन पांचशें वर्षे गेल्यानंतर आजहि तेथें शेंकडों लहानमोठीं शिवमंदिरें काळाला आव्हान देत उभीं असलेलीं दिसतात. लिंगपूजेचा उत्कर्ष या काळीं व या प्रदेशांत मोठ्या प्रमाणांत झालेला दिसतो. येथील मुख्य देऊळ लिंगराज या नांवानेंच प्रसिद्ध आहे. त्याचा प्राकार व त्यांतील लहानमोठीं अनेक मंदिरेंहि, किल्ल्यासारख्या तटबंदीच्या प्राकारांत आजवर सुरक्षित राहिले आहेत. हिंदुस्थानांतील पहिल्या दहा देवळांत याचा समावेश करावा लागेल. एवढें तें प्रचंड शिल्पकृत्य आहे. हें एक मंदिर पाहिल्यानंतर इतर देवळें पाहण्याची वस्तुतः गरज नाहीं. एका देवळांतील लिंग १० फूट उंच आहे. त्याच्या डोक्यावर अभिषेक करावयाचा तर वरच्या मजल्यावरून करावा लागतो. इतर देवळें कमीजास्त प्रमाणांत याच्याच प्रतिकृती आहेत. हिंदु स्थापत्यशास्त्र या मंदिराच्या काळांत शिखरास पोंचलेलें दिसतें. या लेखांत ह्या मंदिराचें वर्णन करण्याचा बेत नाहीं. व तें शक्यहि नाहीं. त्यावरील स्वतंत्र पुस्तकेंच वाचलीं पाहिजेत. आम्हीं तेथील दहावीस वेगवेगळीं मंदिरें डोळ्याखालीं घातलीं. त्या प्रत्येकांत विविधता व सूक्ष्म भेद पुष्कळच आहेत. देवळाच्या खांबावरील, भिंतींवरील व शिखरांवरील कोरीव मूर्ती इतक्या विविध व उच्च कौशल्याच्या आहेत कीं, हिंदु संस्कृतीचा व समाजाचा संपूर्ण इतिहास लिहिणारास त्यांचा सुदीर्घ अभ्यास करावा लागेल. आज एतद्विषयक बरींच पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं असलीं तरी तीं गोळाबेरजी स्वरूपाचीं आहेत. सूक्ष्म अभ्यास करून सर्व दृश्यांची छाननी व संगति त्यांत केलेली आढळत नाहीं. व त्यावांचून त्यांचा खरा अर्थ इतिहासकारास लावता येणारच नाहीं.

जगन्नाथाचें मंदिर हें भुवनेश्वराच्या मंदिराच्या तुलनेनें एक हलकी नक्कल म्हणावी लागेल व ती पुढील काळांतील दिसते. जगन्नाथाचें मंदिर मध्यंतरीं एकदा केव्हां तरी मुसलमानी अमदानींत भ्रष्ट होऊन त्याचा पुनरुद्धार झाल्याच्या खुणा तेथें स्पष्ट दिसतात. चलू यात्रेचें मोठें स्थान म्हणून त्याला अशी तोशीस लागली असावी. भुवनेश्वराचीं मंदिरें ओसाड राजधानींत राहिल्यामुळें मुसलमानांच्या तडाख्यांतून बरींचशीं वांचलीं. सबंध हिंदुदेवस्थान भ्रष्ट व छिन्नविच्छिन्न करून तेथें मुसलमानी धर्मस्थान निर्माण केल्याचा एक प्रकार खुद्द कटक राजधानींत आजहि पहावयाला मिळतो व तो मोठा कुतूहलजनक आहे. या देवस्थानाचें नांव ' कदम रसूल ऊर्फ प्रेषित महम्मदाचें पाऊल ' असें आहे. येथें एका शाळुंकेसारख्या वर्तुळांत मध्यंतरीं एक पाऊल पाण्यांत सतत भिजत ठेवल्यासारखें राखलेलें दृष्टीस पडतें. बापडा पैगंबर महम्मद हिंदुस्थानास कधींच आला नव्हता, तरी तो येथें आला होता व त्याचें पाऊल येथें उमटलेलें आहे असें स्थानिक मुसलमान मानतात. यावरून या बाट्या इस्लामी लोकांच्या मनावर अजूनहि मूळ स्थानिक संस्कृतीचें केवढें दडपण शिल्लक आहे हें दृष्टीस पडतें. तर्क धांवतो कीं येथें बहुधा मूळ बौद्धांची विष्णुपदाप्रमाणें पादुका असावी. स्थानिक लोक अतिप्राचीनपणामुळें हें जागृत स्थान नष्ट करण्यास राजी नव्हते. तेव्हां त्यांनीं मूर्तिपूजा अशिष्ट मानणाऱ्या इस्लामी पंथांत अशा रूपानें त्या दैवताचा समावेश केला. याला हिंदुमुसलमान आजहि भजतात. पादुकेभोंवतालच्या शाळुंकेंतील पाणी तीर्थ म्हणून भक्तांस देण्यांत येतें. वांझ बायांस तेणेंकरून अपत्यप्राप्ति होते अशीहि त्याची फलश्रुति सांगण्यांत येते. पण आतां बर्थ कंट्रोलचा काळ आला तेव्हां या दैवताचा उपयोग कोण करून घेणार !

## हिंदी संस्कृतीच्या स्थित्यंतरांचें प्रात्यक्षिक

बहुत काळ केवळ पांडवकृत्य म्हणून आठवणींत राहिलेली उदयगिरि-खंडगिरीचीं कोरीव लेणीं हल्लीं पुनः जैनांचें यात्रास्थान बनलीं आहेत. कोणी जैन शेटीनें तेथें एक आधुनिक देऊळ तीर्थंकराच्या संगमरवरी मूर्तीसह बांधून तेथें वसती करविली आहे. भुवनेश्वर हें शैवांचें, पुरी हें वैष्णवांचें व याजपूर (जाजपूर)—भद्रक हीं जुन्या बौद्ध महायान पंथांतून

पुढें आलेल्या शाक्तांचीं स्थानें आज दिसतात. याखेरीज कोणार्क हें पुरीच्या ईशान्येस समुद्रकाठीं अगदीं ओसाड वाळवंटांत भग्न स्थितींत पडलेलें स्थान सूर्यपूजेची एकाकाळची महती आजहि पटवून देत आहे. गाणपत्यांचेंहि दर्पण नांवाचें एक क्षेत्र आहे असें समजतात. एवंच ओढिसांत सर्व पंथांचें कायम प्रदर्शनच मांडलेलें दृष्टीस पडतें. शंकराचार्यांच्या मठस्थापनेपासून येथें वैदिक ब्राह्मण्याचेंहि पुनरुज्जीवन कांहीं ब्राह्मणजातींनीं करून आजवर राखलेलें दृष्टीस पडतें. यापैकीं कोणार्कचा सौरपंथ हा इराणांतून आलेला असावा असा सूर्याच्या पायांत बूट घातलेल्या मूर्तींवरून बोध होतो. असल्या मूर्तींना क्वचित् दाढीहि असते. कोणार्कचें भग्न मंदिर सूर्याच्या चाकांवर बांधलेल्या रथाच्या स्वरूपाचें असून, तें एक जगांतील आठवें आश्चर्य म्हणण्याच्या लायकीचें आहे. युरोपीय जलयानें इकडे संचार करूं लागलीं तेव्हां समुद्रांतून दूरवरून दिसणारें हें काळें मंदिर लांबून खुणा म्हणून त्यांनीं लक्षांत ठेवून त्याला 'ब्लॅक पागोडा ऊर्फ काळें देऊळ' असें नांव ठेवलें होतें. आतां समुद्र मंदिरापासून सुमारें अर्धा मैल मागें हटून वाळवंटांत थोडी झाडीहि मुद्दाम वाढविलेली दिसते. सागराच्या खाऱ्या पाण्याच्या तुषारानें मंदिराचे दगड अनेक ठिकाणीं झडून बेरंग झालेले आहेत. तरीहि अजून त्यांतील पुष्कळ भाग मूळाची कल्पना येण्याइतका सुरक्षित राहिला आहे. मूळ मंदिराचें एक शिखर केव्हां तरी आपोआप किंवा हल्ला केल्यामुळें कोसळून अस्ताव्यस्त इतस्ततः पडलेलें दिसतें. त्यांतलि कांहीं भागाचें संरक्षण पुनर्रचना करून पुराणवस्तुखात्यानें केलें आहे. या देवळावर कामशास्त्रांतील संभोगासनें कोरलीं असावीं असा अवशेषांवरून तर्क होतो. या सगळ्या मूर्तींचें शिल्प उच्च दर्जाचें आहे, पण त्यांनीं काय साधण्याचा मंदिरस्थापकांचा हेतु होता त्याचा आज पंडितांनाहि तर्क करतां येत नाहीं. असलीं चित्रें हिंदुस्थानांत सर्वच मंदिरांवर दृष्टीस पडतात, पण तीं इतक्या मोठ्या प्रमाणांत अन्यत्र कोठेंहि नाहींत. जगन्नाथाच्या मंदिरावरहि तीं आहेतच. म्हणजे ओढिसांत या प्रकाराचा अतिरेक झालेला दिसतो. अनेक इतिहासपंडित अशा नैतिक ऱ्हासामुळेंच हिंदूंना मुसलमानांपुढें टिकाव धरतां आला नाहीं असे उद्गार हें मंदिर पहात असतांना काढतांना आढळले. हीं चित्रें पाहिल्यानंतर हॅवेलॉक एलिस हा या मध्ययुगीन हिंदूंपुढें बाल ठरेल असें वाटतें. कारण त्यानें वर्णिलेल्या विकृत (?) प्रकारांचें साम्रसंगीत चित्रीकरण या मंदिरावर केलेलें आढळतें. या पुराव्यावरून एवढेंच निश्चित म्हणतां येतें कीं, हिंदी संस्कृतीचीं स्थित्यंतरें अजूनहि आपल्याला खऱ्या अर्थानें कळलेलीं नाहींत.

## हिंदु लष्करी शिल्पशास्त्राचा नमुना

ओढिसांत पाहिलेला दुसरा एक प्राचीन अवशेष म्हणजे शिशुपालगढचा किल्ला होय. हा मुसलमानपूर्वकालीन असल्यामुळें हिंदू किल्ल्यांचें स्वरूप काय होतें तें समजण्याच्या दृष्टीनें अतिशय महत्त्वाचा आहे. कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत व इतरत्र किल्ल्यांच्या रचनेबद्दल उल्लेख आढळतात; पण त्यांचें प्रात्यक्षिक पहावयास मिळत नव्हतें तें ह्या अवशेषांत आढळतें. सुमारें मैलभर लांबीच्या विस्तीर्ण चौकोनांत हें तटबंदीचें शहर सपाट प्रदेशांत वसलेलें होतें. त्याचे तट म्हणजे आज मातीचीं लहान टेकाडेंच वाटतात. ज्याला हा अवशेष आहे याची कल्पना नसेल, त्याला ते मनुष्यकृत असतील असें क्वचितच भासेल. एखाद्या मोठ्या शेताला उंच मातीचें कुंपण करावें तसा या किल्ल्याचा देखावा आहे; पण आतां त्या ढिगाऱ्यांतून किल्ल्याचे दरवाजे जांभ्या दगडांच्या चिऱ्यांनीं रक्षणाच्या दृष्टीनें बांधून काढलेले, खणून बाहेर पडले आहेत. तटाच्या भोंवतीं आजहि पाण्यानें भरलेले खंदक तळ्यासारखे भासणारे, दिसत आहेत. बहुधा तटासाठीं माती खणल्यामुळेंच ते आपोआप तसे बनले असावेत. या परिसरांत शिशुपाल नांवाचें जें लहान खेडें वसलेलें आहे, त्यावरून या किल्ल्याला शिशुपालगढ असें नांव देण्यांत आलेलें आहे. एरवीं या नांवाचा किल्ला प्राचीनकाळीं होता असें म्हणण्याला निश्चित आधार अजून सांपडलेला नाहीं. पण नांव कोठलेंहि असलें, तरी तो किल्ला आहे याबद्दल संशयास जागा नाहीं. तटबंदीच्य-

आंतील जागेंत आज सर्वत्र शेतें पसरलेलीं आहेत. इमारती अशा फारशा कोठें दिसत नाहींत; नाहीं म्हणावयास एका मध्ययुगीन वाड्याचे दगडी खांब अवशेषरूपानें उभे आहेत. पण हा वाडा बराच पुढील काळांतील दिसतो. भुवनेश्वरापासून नजिकच हा किल्ला असल्यामुळें तो पुढील काळांतहि राजांच्या रहाण्याचें ठिकाण होतें कीं काय अशी शंका येते. निदान हा परिसर फार प्राचीन काळापासून ओडिसाच्या राजधानीचें ठिकाण बनला असावा असें वाटतें. पुराण-वस्तुखात्यानें अजून याचें सचित्र वर्णन प्रसिद्ध केलें नाहीं. तें झाल्यानंतर हिंदु संरक्षक शिल्पशास्त्रावर नवा उजेड पडेल.

## मराठ्यांच्या राजवटीचा संदेश

कटक हें राजधानीचें शहर मूळ दक्षिणेकडील काठजुरीच्या फाट्यावर वसलेलें होतें. नदीनें शहरावर आक्रमण करूं नये म्हणून नदीकांठ जांभ्या दगडाच्या उंच तटबंदीसारख्या भिंतींनीं बांधून काढलेला आहे. बांधकाम ढासळूं नये म्हणून मध मधें बुरुजासारखी रचना केलेली आहे. तट उतरता आहे. पाण्याला पोंचल्यावर तेथें घाटासारखी रचना केलेली आढळते. नागरिकांना नदीला जाण्यासाठीं मधें मधें वाटा ठेवण्यांत आल्या आहेत. इकडे उंच इमारती बांधण्याचा प्रघात दिसत नाहीं. अठराव्या शतकांतील इंग्रजांच्या बंगल्याप्रमाणें सपाट जमिनीवर एकमजली विस्तृत इमारती बांधलेल्या सर्वत्र दिसतात. शहरांतील गरीब वस्तीचा भाग अजूनहि ताडाचे झाप व गवत यांनीं आच्छादलेला असतो. ईस्ट इंडिया कंपनीच्या युरोपीय शिक्षाचें अनुकरण या प्रदेशांत सर्वत्र झालेलें आढळतें. लोकांची रीतभात अजून जुनीच राहिलेली आहे. या राजधानीच्या शहरांत सुद्धां बाथरूम बांधण्याचा प्रघात अजून रूढ झालेला नाहीं. उघड्यावरच स्नान कॉलेज विद्यार्थीहि करतात. जुना प्रघात नदीवर किंवा तलावावर जाऊन स्नान व धुणें उरकण्याचा असावा. भात हेंच मुख्य अन्न; भाजीपाला बेताचा. दूधदुभतेंहि तसेंच. याचें कारण मत्स्यमांसाहार हें आहे. कटकला भोंसल्यांची राजधानी पन्नास वर्षें होती. त्यांच्या वसतीच्या खुणा तेथें किल्ला, घोड्याच्या पागा वगैरे स्वरूपाच्या आहेत. एक राममंदिरहि त्यांनीं आश्रय दिलेलें असें दाखविण्यांत येतें. देवळांत पुराण, भजनादी-साठीं ताडपत्रावर लिहिलेले ग्रंथ आजहि ठेवलेले दिसतात. रामानुजपंथाचा प्रसार इकडे बराच झालेला दिसतो. कटकच्या किल्ल्याचें नांव बाराबाटी असें असून त्याचा स्थानिक अर्थ ज्याचें क्षेत्र बाराबाटी—(क्षेत्रफळाचें एक प्रमाण)—इतकें आहे असा होतो. आज तटबंदीचा भाग फारसा शिल्लक नाहीं. मुख्य दरवाजा तेवढा बराचसा उभा आहे व रुंद खंदक आजहि आंत पाणी राखून राहिलेले आहेत. खंदकाच्या बाजू चिऱ्यांनीं बांधून काढलेल्या आहेत. हा किल्ला शहराच्या वायव्येस महानदीच्या मुख्य पात्राच्या कांठावर दक्षिणेस आहे. मुसलमानांच्या अंमलाची निदर्शक अशी एक गढीवजा मशीद हीच काय ती इमारत उभी आहे. बाकीचे अवशेष इंग्रजांनीं आपल्या ताब्यांत आल्यावर बांधलेले वा दुरुस्त केलेले दिसतात. येथें जो बंदीखाना होता त्याच्या भिंतींत जुन्या मूर्तींचे अवशेष आढळले यावरून त्या, हिंदूंचीं देवळें पाडून, त्यांच्या अवशिष्ट दगडांच्या बनविलेल्या असाव्या. महायुद्धापासून या किल्ल्यांत फौजेचा तळ पडला असल्यानें जुने अवशेष सपाट करून लष्कराच्या सोयीसाठीं नव्या इमारती उभारण्यांत आल्या व अलीकडे स्वतंत्र प्रांत झाल्यानंतर मुख्य प्रधानादि वरिष्ठ अधिकाऱ्यांसाठीं-हि येथें साध्या इमारती बांधण्यांत आलेल्या आहेत. येथेंच मेहताबांनीं इतिहास-परिषदेच्या पाहुण्यांस उमा खाना दिला. करमणुकीसाठीं स्थानिक गायन व नृत्य दाखविलें. या नृत्यांच्या संगीतांहि कोंकणचा भास झाला. नृत्यप्रकार गांवठी वन्य संस्कृतीचा निदर्शक दिसला. शंकराचार्यांचें मोहमुद्गर (संस्कृत) एका मुलीनें तालसुरांत म्हटलें. तिला 'वन्समोअर' मिळाला. समारंभांत हरेकृष्ण स्वतः तीन तास खडे उभे होते. कोठें बसलेले आढळलेच नाहींत. गव्हर्नर आसफअली समारंभास हजर होते. ते स्वतःस किंचित् कम्युनिस्ट समजतात. कटक जिल्ह्याच्या जुन्या रेकॉर्डांत भोंसल्यांच्या वेळच्या मोडींत लिहिलेल्या

सनदा सांपडतात. त्या बऱ्याचशा देवस्थानें, मठ, महंत, ब्राह्मण यांना धर्मकृत्यासाठीं व तुलसी-फुलें वहाण्यासाठीं दिलेल्या आढळल्या. मराठ्यांच्या राजवटीचा हा संदेश सर्वत्र आढळतो. कांहीं महाराष्ट्रीय घराणीं इकडे स्थानिक रहिवाशांत मिळून गेलेलीं ऐकण्यांत येतात. संपूर्ण संशोधन करण्यास इकडे वर्ष सहामाहिने तळ ठोकला पाहिजे व त्याचा लाभहि बहुत होण्याचा संभव आहे. इतिहासाच्या धाग्यानेंच ओढिसा महाराष्ट्राशीं जोडला गेला आहे, त्याचें पुनरुज्जीवन करणें आपलें कर्तव्य आहे. या मागसलेल्या प्रांतात नवीन धाडस करून धंदा करणारास अनेक क्षेत्रांत वाव आहे. सेवावृत्तीनें व स्थानिक लोकांशीं मिळूनमिसळून राहून उभयताचा फायदा घडवून आणणें अशक्य नाहीं. महाराष्ट्रीयांनीं या वर्धिष्णु प्रांताचें विस्मरण होवूं देऊं नये.

---

## भारतीय मुसलमानांच्या राज्यनिष्ठेची परीक्षा

आज भारतीय मुसलमान स्वसंरक्षणाच्या उद्देशानें निधर्मी राज्याचा पुकारा करतात, पाकिस्तानी धोरणाचा धिक्कारहि करतात; परंतु पूर्वी पाकिस्तानच्या मागणींत सर्वांत मोठा आवाज हिंदुस्थानी मुसलमानांचाच होता. आज तेच मुसलमान पाकिस्तानी मनोवृत्तीचा जो निषेध करतात त्याचें कारण, एक तर त्यांचे डोळे आतां उघडले असावेत व त्यांना पश्चात्ताप तरी होत असला पाहिजे किंवा त्यांची राज्यनिष्ठेची प्रतिज्ञा नुसती वरपांगी तरी असली पाहिजे. यांतील खरें काय तें ओळखायची एक खूण आहे. भारतांत रहाणाऱ्या प्रत्येक मुसलमानानें स्वतःला हे प्रश्न विचारावेत : १ काश्मीर पाकिस्तानला मिळावें, किंवा निदान तें भारताला मिळूं नये असें मला वाटतें काय ? २ पुढेंमागें आसाम हा पाकिस्तानचा भाग बनावा असें मला वाटतें का ? ३ हैदराबाद भारताला मिळालें याबद्दल मला वाईट वाटतें का ?—हे प्रश्न फार महत्त्वाचे आहेत. या प्रश्नांचीं उत्तरें जर अंतःकरणांतून होकारार्थी येत असलीं, तर समजावें कीं, अजून त्या अंतःकरणांत पाकिस्तानचें भूत शिल्लक आहे ! ज्या मुसलमानाच्या हृदयांत या प्रश्नांचीं उत्तरें नकारार्थी येत असतील त्यानें हिंदुस्थानांतून पाकिस्तानी मनोवृत्तीचें उच्चाटन करण्याची पराकाष्ठा केली पाहिजे.

—आचार्य दादा धर्माधिकारी, 'सर्वोदय' मार्च १९५० च्या अंकावरून

---

## इटलींतील पुरंध्री

इटॅलिअन कुटुंबांत आजीला विशेष मान असतो. सर्व कुटुंबांत तिला पहिल्या प्रतीचा दर्जा असून ती सौजन्याची मूर्तिमंत प्रतिमा असते. चीन देशांतही असेंच असतें. बाईची पन्नाशी उलटली कीं ती कुटुंबाची सम्राज्ञी बनून कुटुंबावर आपला सौजन्यमय अधिकार गाजविते. तिच्यामुळेंच जणुं सर्व घर उभें असतें ! प्रत्येक गोष्टीवर तिची संरक्षक नजर असते. तिच्या हालचालींतून आणि हावभावांतून जो स्नेह ओसंडत असतो, तो पाहून मायकेल अँजेलोच्या चित्रांतलि जणुं सर्व मानवतेला हृदयाशीं कवटाळूं पहाणाऱ्या औदार्यपूर्ण प्रेमळ व्यक्तिरेखांची आठवण होते.

—इगॉर मार्केविच् यांच्या "Made in Italy" या इटलींतील नवजीवनप्रवाहाचें दिग्दर्शन करणाऱ्या पुस्तकामधून











अनुक्रमणिका

श्री. इर्व्हिंग ब्राऊन

# हिंदुस्थानांतील ट्रेड युनिअन चळवळ

आजे हिंदुस्थानात आर्थिक, राजकीय आणि सामाजिक विचारक्षेत्रांत जो गोंधळ आणि गुंतागुंत दिसून येतात त्यांतून ट्रेड युनिअन चळवळीचें मुख्य सूत्र सुव्यवस्थित निवडून काढायचें तर, ज्या परिस्थितींतून सध्यांचें भारतीय सरकार उदयास आलें त्यापूर्वीच्या व चालू परिस्थितीचा आपणांस विचार करावा लागेल. दोन वर्षांपूर्वी हिंदुस्थान स्वतंत्र आणि प्रभुत्वसंपन्न राष्ट्र बनलें. २०० वर्षे चाललेल्या संग्रामाचा शेवट झाला असला तरी भूतकाळांतील संस्कारांचा पगडा वर्तमानकाळावर जबरदस्त बसलेला आहे. जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत जहाल राष्ट्रवादाचा ठसा उमटलेला आहे. साम्राज्यवादाविरुद्ध शेंकडों वर्षें चालविलेल्या संग्रामाचे संस्कार एकदम कसे निघून जातील ! भारतीयांच्या राष्ट्रीय विचारांत व भावनेंत अजूनहि परकीयांच्याविषयीं संशय, गोऱ्या लोकांबद्दल वैमनस्य, स्वतःच्या वंशाबद्दल हळवा अभिमान या विकारांचें प्राबल्य दिसून येतें; त्यामुळें साहजिकच भारतीयांच्या विचारांवर व कार्यपद्धतीवर त्या विकारांची छटा पसरलेली आहे.

ज्या कॉंग्रेस पक्षानें सरकार चालविण्याची जबाबदारी स्वीकारली आहे तोच महान् ऐतिहासिक राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळीचा अध्वर्यु होता. या पक्षामध्यें हिंदी समाजांतील सर्व प्रकारचे घटक एकाच शत्रूविरुद्ध झगडण्याच्या समान ईर्ष्येनें प्रेरित होऊन एका काळीं समाविष्ट झाले होते. त्यामुळें या पक्षाच्या रूपानें एका व्यापक पायावर राष्ट्रीय आघाडी उभारली गेली होती. आज त्याच पक्षावर राज्य चालवायची जबाबदारी येऊन पडली आहे. परंतु दुर्दैवानें त्या पक्षाच्या ध्येयवादाला आज ओहोटी लागली आहे. या अफाट संघटनेला ज्या एका ध्येयसूत्रानें एकत्र बांधून ठेवलें होतें तें ध्येयसूत्र नष्ट झालेलें आहे. नुकतेंच कांहीं दिवसांपूर्वी जो कॉंग्रेस पक्ष "अमक्याअमक्या गोष्टी करूं नका" म्हणून लोकांमध्यें प्रचार करीत होता त्याच कॉंग्रेस पक्षाला आज त्याच गोष्टी करण्याबद्दल लोकांना आर्जवून सांगावें लागत आहे. उदा० उत्पादन वाढविणें, लष्करी संघटना विशाल व मजबूत करणें, संप व क्षोभ बंद करणें, राष्ट्रीयीकरण व आर्थिक उपाय हीं आस्ते-आस्ते अवलंबिणें, जमीनदारी एकदम तडकाफडकी नष्ट

१ प्रस्तुत लेख हा मुंबई येथील 'टाटा इन्स्टिट्यूट ऑफ सोशल सायन्सेस'च्या "दि इंडिअन जर्नल ऑफ सोशल वर्क' ह्या त्रैमासिकाच्या डिसेंबर १९४९ च्या अंकांत आलेल्या लेखाचा विस्तृत सारांश आहे. या लेखाचे लेखक श्री. इर्व्हिंग ब्राऊन हे "अमेरिकन फेडरेशन ऑफ लेबर"चे युरोपकरितां नेमलेले प्रतिनिधि आहेत. त्यांनीं इंदूर येथें मे १९४९ मध्यें भरलेल्या 'इंटक'च्या नॅशनल कन्व्हेन्शनमध्यें निमंत्रित पाहुणे म्हणून भाषण केलें.-प्रस्तुत लेखांत हिंदुस्थानांतील मजूर चळवळीपुढील प्रश्न, या देशांतील ट्रेड युनिअन चळवळीचा इतिहास, त्या चळवळीचीं वैगुण्यें यांचें दिग्दर्शन केलें आहे. भारतीय सरकारच्या मजूरविषयक धोरणाचें ब्राऊन यांनीं सडेतोड परीक्षण केलें असून, ट्रेड युनिअन चळवळीच्या स्वतंत्र निरामय विकासाला तें धोरण परिपोषक नाहीं असें त्यांनीं आपलें मत दिलें आहे. --का. सं.





अनुक्रमणिका

करण्याऐवजी क्रमविकासपद्धतीनें ती नाहींशीं करणें, सरकारविरुद्ध अशांतता माजविणाऱ्यांना—विशेषतः सरकार उलथून पाडायचे प्रयत्न करणाऱ्या कम्युनिस्ट व तत्संबद्ध दहशतवाद्यांना दडपून टाकणें—यांवर आज सरकारचा भर आहे. एक वेळ जें निंद्य होतें तें आज वंद्य झालें आहे; एक वेळ जें वंद्य होतें तेंच आज निंद्य बनलें आहे.

## एकपक्षीय हुकूमशाहीचा (totalitarian) धोका

आंतून आणि बाहेरून एकपक्षीय हुकूमशाहीच्या भेषिण छाया नेहरू सरकारभोंवतीं पसरल्या आहेत. चीन, ब्रह्मदेश, मलाया, हिंद चीन, बहुतेक आग्नेय आशिया यांच्यांत अंतःस्थ यादवी थैमान घालीत आहे. हिंदुस्थानांत खुद्द आंतून कम्युनिस्टांचा उपद्रव आहेच; त्याचबरोबर बाहेरूनहि हिंदुस्थान कैचींत सांपडल्यासारखा झाला असून त्या कैचीची पकड रशियन अस्वलाच्या हातांत गेली आहे! नकाशाकडे नुसती ओझरती नजर टाकली तरी हें कळून येईल कीं, अतिपूर्वेंत रशियाला प्रतिकार-तोहि कसाबसा करणें जेथून शक्य होईल असें एकच मोठें क्षेत्र शिल्लक राहिलें आहे आणि तें म्हणजे हिंदुस्थान. स्वतंत्र हिंदुस्थानचें हें नवजात अर्भक बिचारें एकटें शत्रूंनीं वेढलेल्या अरण्यांत सांपडलें आहे!

स्वातंत्र्यानंतर लगेच हिंदुस्थानांत असा कांहीं जातीय वणवा भडकला कीं, त्या योगानें हजारों लोक प्राणास मुकले; एवढेंच नाहीं, तर देशांतलि अव्यवस्था आणि गोंधळ यांत भर पडून, सरकार त्रस्त होऊन गेलें! देशाच्या फाळणीमुळें निर्वासितांचा भयंकर प्रश्न 'आ' वासून उभा राहिला. पाकिस्तानमधून निर्वासित झालेले अंदाजें ७० लाख हिंदू हिंदुस्थानांत आश्रयार्थ सोय पहात आहेत. हें जातीय वैमनस्य आणि त्याचे आर्थिक परिणाम यांनीं हिंदुस्थानच्या अडचणींत भर पडली असल्यास त्यांत काय नवल!

त्यांत पुन्हां जनतेचें शतकानुशतकें चालत आलेलें भयंकर दारिद्र्य आणि दुःख यांना तोंड द्यायचें सरकारवर येऊन पडलें. इतकें भयंकर दारिद्र्य माझ्या तरी पहाण्यांत नाहीं. सरकारविरुद्ध चळवळ फोफायला यापेक्षां जास्ती सुपीक जमीन कोठें मिळणार! आणि त्यांत विशेष गोष्ट म्हणजे ज्यांनीं आज राज्ययंत्राचें नेतृत्व पत्करलें आहे, त्यांनींच या दारिद्र्यमय परिस्थितीचा आपल्या चळवळीकरितां व प्रचाराकरितां उपयोग करून घेतला होता.

आज हिंदुस्थानांत लोकशाही जीवनपद्धतीभोंवतीं जीं संकटें उभीं आहेत त्यांच्या मुळाशीं अत्यंत निकडीचे असे आर्थिक प्रश्न आहेत. ते प्रश्न सोडवायचे म्हणजे दीर्घकालीन योजना पाहिजेत.

## ट्रेड युनिअन चळवळ

वर वर्णन केलेल्या भूतकालीन आणि चालू परिस्थितीचा हिंदुस्थानांतलि ट्रेड युनिअन चळवळीवर परिणाम होणें अपरिहार्य आहे. मुख्यतः पहिल्या महायुद्धानंतर प्रतिकूल आर्थिक परिस्थितीमुळें ट्रेड युनिअन चळवळ जरी वाढूं लागली, तरी तिला तीन गोष्टींमुळें मर्यादा पडली. त्या तीन गोष्टी म्हणजे राष्ट्रीय स्वातंत्र्याची चळवळ, रशियन राज्यक्रांतीचा उदय व तिचे जागतिक पडसाद, आणि समाजवादी विचारांचा प्रसार ह्या होत. अगदीं मागें म्हणजे १९ व्या शतकांत देखील हिंदुस्थानांतलि मजूरवर्गांत कांहीं क्षोभाचे प्रसंग, संप वगैरे घडून आले असले, तरी ते लगेच जिरूनहि गेले. त्यांच्यामागून कायम अशी, मजुरांच्या ताब्यांतलि मजुरांनीं चालविलेली ट्रेड युनिअन संघटना शिल्लक राहिली नाहीं. थोडक्यांत म्हणजे पुढारलेल्या पाश्चात्य देशांतल्याप्रमाणें हिंदुस्थानांतील कामकरीवर्गानें स्वतःची अशी संघटना बनविण्यापर्यंत कधींच मजल गांठली नाहीं. परकीयांचें आक्रमण, धार्मिक व जातीय कलह, सार्वत्रिक निरक्षरता, भिन्न भिन्न भाषांचा गोंधळ, आणि शतकानुशतकें चालत आलेलें दुःख, दैन्य आणि दारिद्र्य या कारणसमुच्चयामुळें कामगार वर्गाने स्वतः पुढाकार घेऊन ट्रेड-युनियन चळवळ चालविणें वा संघटित करणें हें शक्यच झालें नाहीं.

ट्रेड युनियन चळवळीचे नेते बुद्धिजीवी आणि मध्यम वर्गांतूनच उत्पन्न झालेले आहेत; या नेत्यांनीं मजूरवर्गाच्या संघटनाचें कार्य मिशनरी वृत्तीनें केलें

आहे. ज्या बुद्धिजीवी लोकांच्या हातांत कामगार-चळवळीचें नेतृत्व आहे त्यांच्या मनोवृत्तींत मिशनरी भावनागंडाबरोबर राजकीय विचार-सरणींचेंहि प्राबल्य दिसून येतें. या बुद्धिजीवी लोकांवर समाजवाद, कम्युनिझम, गांधीवाद या निरनिराळ्या विचारसरणींचा पगडा असून आपापल्या भिन्न भिन्न कार्यक्रमांचा प्रसार व अंमलबजावणी करण्याचें एक साधन म्हणून कामगारचळवळीचा उपयोग करून घेण्याचा ते प्रयत्न करीत असतात. मध्यें घडून आलेली रशियन राज्यक्रान्ति आणि त्यामुळें कामगारां-करितां स्वर्ग निर्माण झाला आहे ह्या खोट्या भावनेची मनावर बसलेली पक्की पकड—ह्यांमुळें कामगार-चळवळीला राजकीय स्वरूप येण्यास आयतेंच फावलें आहे. मार्क्स, लेनिन आणि स्टॅलिन यांची जबरदस्त मोहिनी हिंदी कामगार-वर्गावर पडलेली अजूनहि दिसत आहे.

हिंदुस्थानांत औद्योगीकरण बऱ्याच वेगानें होत आहे. अर्थात् हिंदुस्थानचा अवाढव्य विस्तार आणि ३५ कोट लोकसंख्या यांचा विचार करतां हें औद्योगीकरणाचें प्रमाण अल्पल्पच आहे. बहुजनसमाजाची—साधारणतः शेंकडा ७५ लोकांची उपजीविका शेतीवर चालते. शेतकाम करणारा वर्गहि असंघटित आहे. शेतावर राब-णाऱ्या मजुरांपैकीं पुष्कळ लोक जमीन व घरदार यांना मुकून कारखान्यांचीं केंद्रें अशीं जीं शहरें त्यांच्याकडे धांव घेत आहेत. शहरांतून आधींच लोकांची गर्दी व खेंचाखेंची असल्यामुळें नवीन अभ्यागतांना काम मिळत नाहीं. त्यामुळें औद्योगीकरणाचा प्रश्न अधिकच बिकट होतो. कारखान्याचें व शेतीचें उत्पादन वाढविण्याची गरज हिंदी लोक आणि हिंदी सरकार यांच्यापुढें प्रामुख्यानें आहे.

हिंदुस्थाननें केवळ कच्चा मालच पुरवावा या हेतूनें औद्योगीकरण शक्य तेवढें आंखडतें घ्यायचें असें ब्रिटिशांचें धोरण होतें; परंतु दोन महायुद्धांचा परिणाम म्हणून हिंदुस्थानांत कारखा-न्यांची वाढ करणें केवळ हिंदी हिताच्या दृष्टीनेंच नव्हे, तर इंग्लंडच्या दृष्टीनेंदेखील निकडीचें झालें. हिंदुस्थानचा औद्योगिक व्यवहार हा जरी अत्यल्प असला तरी १९२२ पासूनच हिंदुस्थानला आंतरराष्ट्रीय कामगार संघा-( I. L. O. ) नें एक प्रमुख औद्योगिक राष्ट्र म्हणून गणलें आहे. म्हणून राष्ट्रीय मजूर चळवळ हिंदु-स्थानांत फोंफावणें अपरिहार्यच आहे. प्रश्न एवढाच कीं ती चळवळ कोणत्या दिशेनें वाढणार ? लोकशाही वळणानें का हुकुमशाही सांचेबंदींत ?

## ट्रे. यु. चळवळ हें राजकीय संघर्षाचें क्षेत्र

लेनिनचें एक वचन आहे : " ट्रेड युनिअन संघटना ह्या कम्युनिझमच्या शाळा होत " या वचनानुसार कम्युनिस्टांनीं हिंदुस्थानांतील ट्रेड राजकारणाचा आखाडा बनवून टाकली. पहिल्या महा-युद्धानंतर लगेच 'ऑल इंडिया ट्रेड युनियन कॉंग्रेस' (ऐटक) स्थापन झाली; दुसऱ्या महायुद्धाच्या वेळीं ती संपूर्णपणें कम्युनिस्टांनीं आपल्या हातांत घेतली. याचें मुख्य कारण म्हणजे त्या वेळेस कॉंग्रेस आणि समाजवादी पक्ष, हे त्यांच्या युद्धविरोधी भूमिकांमुळें तुरुंगांत डांबले गेले होते. कम्युनिस्टांनीं मात्र युद्धाला पाठिंबा दिल्याकारणानें त्यांना ब्रिटिशां-कडून मदत आणि आराम मिळाला. या अनुषंगानें लक्षांत येण्यासारखी मजेची गोष्ट म्हणजे ही कीं युद्धाला पाठिंबा दिल्यामुळें युद्धोत्तर युरोपमध्यें कम्युनिस्ट लोकप्रिय झाले; त्याच्या उलट बरोबर त्याच कारणामुळें म्हणजे युद्धाला पाठिंबा दिल्यामुळें कम्युनिस्ट हिंदी जनतेंत अप्रिय झाले ! महायुद्धाच्या काळांत आणखी एक ट्रेड युनिअन संघटना रॉयिस्ट नेतृत्वाखालीं ' इंडियन फेडरेशन ऑफ लेबर ' नांवाची होती; ती कम्युनिस्टविरोधी असूनहि तिचा युद्धाला पाठिंबा होता.

महायुद्धाचा शेवट झाल्यावर कॉंग्रेस पुढारी १९४६ सालीं सुटले, तेव्हां त्यांना आढळून आलें कीं ' ऐटक ' ( A. I. T. U. C. ) ही संपूर्णपणें कम्युनिस्ट पक्षाच्या हातीं गेली असून, त्या 'स्टॅलिनी' संघटनेंत राहून आपणांस कांहींच कार्य करतां यावयाचें नाहीं. म्हणून १९४७ सालीं कॉंग्रेस पक्षानें 'ऐटक' सोडून द्यावयाचें व 'इंटक' ( Indian National Trade Union Congress ) स्थापन करावयाचें

ठरविलें. यानंतर लवकरच समाजवादी पक्ष कॉंग्रेसमधून बाहेर पडला. एवढेंच नव्हे तर 'ऐटक' (A. I. T. U. C.) सोडावयाचें त्यानें ठरविलें. 'ऐटक'मधून फुटून निघतांना समाजवादी पक्षाच्या चिटणिसानें म्हटलें होतें : "ट्रेड युनिअन चळवळींत फूट पडावी ही गोष्ट अत्यंत शोचनीय होय. परंतु राजकीय धोरणांत जेव्हां भयंकर मतभेद होऊन कोणताहि विधिनिषेध न बाळगतां राजकारणाकरितां मजूरवर्ग वापरण्यापर्यंत पाळी येते, तेव्हां ट्रे. यु. संघटनेंत फूट पडणें अपरिहार्यच होतें. गांधीवादी तत्त्वें कामगारचळवळीला लावण्याच्या मिषानें कामगारवर्गाला सरकारच्या मार्गे ओढून नेण्याचा जर कॉंग्रेसनें प्रयत्न केला नसता तर ट्रे. यु. चळवळीमधील कम्युनिस्टव्यतिरिक्त शक्ती एकजुटीनें उभ्या राहूं शकल्या असत्या. परंतु 'इंटक'च्या एक पक्षीय आणि हुकूमशाही धोरणानें त्या शक्तींना बाहेर पडण्याशिवाय गत्यंतरच उरलें नाहीं." म्हणून १९४८ सालीं समाजवाद्यांनीं आपली एक स्वतःचीच 'हिंद मजदूर सभा' नांवाची ट्रेड युनिअन संघटना काढली.

'हिंद मजदूर सभा' 'इंटक'वर ज्या पापाचा (म्हणजे ट्रेड युनिअन चळवळ राजकीय पक्षाच्या वेठीला बांधायचा) आरोप करते, तेंच पाप ती स्वतः करीत आहे, असा युक्तिवाद करून लगेच 'रेव्होल्यूशनरी सोशॅलिस्ट' आणि 'रेव्होल्यूशनरी कम्युनिस्ट' पक्षाच्या पुढाऱ्यांनीं 'युनायटेड ट्रेड युनिअन फेडरेशन'ही निराळी चौथी संघटना काढली. या यु. ट्रे. यु. फे.' चें नेतृत्व 'ऐटक' चे एक वेळचे सरचिटणीस मृणालकांति बोस यांचेकडे आहे.

अशा रीतीनें हिंदुस्थानांत हल्लीं चार ट्रेड युनिअन संघटना आहेत. प्रत्येक संघटनेनें आपले सदस्यसंख्येचे अधिकृत आंकडे प्रसिद्ध केले आहेत ते असे :- इंटक १२ लक्ष; हिं. म. स. ६ लक्ष; यु. ट्रे. यु. फे. ३ लक्ष. 'ऐटक'चे एक वेळ ९ लक्ष सभासद होते. आतां ती संख्या ३ लक्षांपर्यंत उतरली आहे. 'ऐटक' चे बहुतेक पुढारी तुरुंगांत, भूमिगत किंवा निर्वासित आहेत. म्हणजे ३५ कोटी लोकसंख्येच्या हिंदुस्थानांत ट्रेड युनिअनची सदस्यसंख्या २० लक्षांपेक्षां थोडी जास्त आहे एवढेंच. हिंदुस्थानांत शेतांतून आणि कारखान्यांतून मजूरी करणारे अंदाजें १० कोट आहेत; त्यांपैकीं कारखान्यांतून काम करणारे सुमारें ५० लक्ष असतील. हिंदुस्थानांतील ट्रेड युनिअन चळवळींतून निरनिराळ्या राजकीय प्रवृत्तींचें व संघर्षांचें प्रतिबिंब कसें दिसून येतें हें वरील वर्णनावरून स्पष्ट होईल.

या राजकारणावरील भरामुळें ट्रेड युनिअन संघटना हिंदुस्थानांत विकास कां पावूं शकली नाहीं, तिचें स्वरूप मागसलेलें कां राहिलें याची कारणमीमांसा करतां येईल.

हिंदुस्थानांतील अनेक शहरांतून ट्रेड युनिअनचीं केन्द्रें आहेत; परंतु एकाच धंद्यांतील कामगारांच्या संघटना अशा फार थोड्या आढळतात. रेल्वे, कापड इत्यादि कांहीं थोड्या धंद्यांच्याच राष्ट्रीय संघटना आहेत. कित्येक शहरांतून कारखान्यांतील कामगारवर्गाच्या त्या त्या शहरापुरत्या संघटना आहेत; तरी पण अखिल राष्ट्रीय संघटनेची कल्पना अजून प्रत्यक्षांत येऊं शकलेली नाहीं. अर्थात पुष्कळशा शहरी ट्रेड युनिअन्स 'इंटक' किंवा 'हिं. म. स.' यांसारख्या केंद्रीय संघटनेला जोडलेल्या आहेत.

बहुतेक ट्रेड युनिअन्सना संघटनेचें दैनंदिन काम करायला कायमचे अधिकारी किंवा चिटणीस नाहींत. पुष्कळसे बुद्धिजीवी लोक या युनिअन्सचे एक एक जण २०, ३० किंवा ४० युनिअन्सचे अधिकारी म्हणून विनावेतन काम करीत असतात. म्हणजे असा प्रत्येक अधिकारी आपला पगार इतर कामांतून किंवा आपापल्या पक्षाकडून काढतो. ट्रेड युनिअन्सचें वर्गणीचें उत्पन्न इतकें कमी असतें कीं, त्यांचा कारभार किंवा कायम अधिकाऱ्यांचा पगार यांचा खर्च त्यांतून भागणें शक्य नसतें. कामकऱ्यांना महिना १ ते २ सेंट वर्गणी असते. साहजिकच अशा संघटनांना बाहेरच्या म्हणजे राजकारणी व बुद्धिजीवी लोकांच्या मदतीवर अवलंबून रहावें लागतें.

# हिंदुस्थानांतील ट्रेड युनिअन चळवळ

ट्रेड युनियन चळवळ हिंदुस्थानात इतके दिवस चालू असूनहि 'सर्वांनीं संघटितपणें मागणी (collective bargaining)' करण्याची पद्धत अजून कोठेंहि अमलांत आलेली दिसत नाहीं. राजकारणाला दिलेलें प्राधान्य, मालकांची प्रतिकूल वृत्ति आणि कामगारवर्गाचें मागसलेपण हीं त्याचीं प्रामुख्यानें कारणें आहेत. परंतु वरच्या प्रतीच्या कामगारां–(skilled workers)मध्यें खऱ्या ट्रेड युनिअन चळवळीची वाढ होत असून ट्रेड युनिअन केवळ राजकीय पक्षांचें किंवा सरकारचें शेपूट बनण्याऐवजीं तिच्यांतून सर्वांची सुसंघटित मागणी मांडली जावी, आणि कामकऱ्यांच्या हितसंबंधांचें रक्षण व्हावें, ही प्रवृत्ति वाढत आहे. या प्रवृत्तीचे मुख्य पुरस्कर्ते श्री. ना. म. जोशी हे आहेत. ते पूर्वी 'ऐटक'चे सरचिटणीस होते. परंतु त्यांतलि राजकारणाचा किळस येऊन ते बाहेर पडले. ट्रेड युनियन ही संघटना राजकारण आणि सरकारी नियंत्रण यांपासून अलिप्त रहावी, ती सर्वांची एक संयुक्त आघाडी बनावी अशा मताचे ते अत्यंत प्रभावी प्रवक्ते आहेत. मलाहि असें वाटतें कीं, हिंदुस्थानांत जर मोठी बलाढ्य आणि स्वतंत्र अशी ट्रेड युनिअन संघटना निर्माण करावयाची असेल तर त्याकरितां 'इंटक' आणि 'हिंद मजदूर सभा' यांच्यांत एकमत किंवा कांहीं समझोता होणें आवश्यक आहे.

## समाजसुधारणाकार्य

भयंकर आर्थिक दारिद्य आणि संघटित एकमुखी मागणीचा अभाव या कारणांमुळें ट्रेड युनिअन चळवळीचें कार्य हें आतांपर्यंत कामगारांच्या जीवनांतील सामाजिक बाजूच सुधारण्या-(Social welfare activities)कडे केंद्रित झालें आहे. पुष्कळ कारखान्यांतून स्त्री-कामगारांच्या मुलांकरितां शिशु-संगोपनकेंद्रें(Creches)उघडलीं आहेत. कारखान्यांतून कामगारांकरितां दवाखान्यांची सोय केलेली असून त्यांतून औषधोपचार केला जातो. आधींच भयंकर दाट वस्तीच्या शहरांतून जागेच्या अभावीं कांहीं कारखानदारांनीं कामगारांकरितां, स्थानिक युनिअनच्या दडपणामुळें म्हणा अथवा स्वेच्छेनें म्हणा, घरांची सोय केली आहे. अर्थात् बहुतेक जागीं समाजसुधारणाकेंद्रें उघडण्यामागील हेतु कामगारांकडून अधिक उत्पादन करवून घ्यावें हा आहे. समाज-सुधारणा-केंद्रांची संख्या दर्यामें खसखस इतकी अत्यल्प असून त्या योगानें या प्रश्नाचा पापुद्राहि खरवडला गेलेला नाहीं. उलट ट्रेड युनिअनचें जें खरें कार्य, ट्रेड युनिअन व कारखानदार यांमधील खऱ्या संबंधांची जी जाणीव, त्यांपासून या समाजसुधारणा-कार्यामुळें कार्यकर्त्यांचें लक्ष विचलितच झालें आहे. त्यामुळें ट्रेड युनिअन्स या कारखानदारांच्या पंखाखालीं गेल्यासारख्या झाल्या आहेत. 'आमची सामाजिक स्थिति सुधारा' अशी विनवणी कारखानदारांना दर वेळीं करण्याच्या प्रवृत्तीमुळें, ट्रेड युनिअनची एक स्वतंत्र चळवळ म्हणून तिला जी धार यायला पाहिजे, ती बोथटच होत जाते. खाजगी कारखानदारांच्या या समाजकल्याण-योजनांच्या जोडीला अलीकडे सरकारचें 'मायबाप' (paternalism) धोरण सुरू झालें आहे.

## सरकारचा हस्तक्षेप

हिंदुस्थानांतील ट्रेड युनिअनच्या क्षेत्रांत सरकारनें काँग्रेस पक्षाच्या द्वारें फार जोराचा असा हस्तक्षेप केलेला आहे. 'इंटक' ही संघटना सरकारचें अंग (arm of the government) असून तिनें सरकारचीं उद्दिष्टें व धोरणें पार पाडावींत असें काँग्रेस पक्ष मानतो. मात्र त्यामुळें 'इंटक' म्हणजे कामगारांचें नियंत्रण करण्याचें एकपक्षीय हुकुमशाहीचें एक हत्यार आहे असें मानण्याचें कारण नाहीं. तसें मानणें म्हणजे वस्तुस्थितीचा विपर्यास करणें होईल. एवढेंच नव्हे तर तसें मानण्यानें एक लोकसत्ताक राष्ट्र म्हणून हिंदुस्थानला ज्या एका परिस्थितीला तोंड द्यावें लागत आहे त्या परिस्थितीच्या संदर्भांत ट्रेड युनिअन चळवळीचा अर्थहि आपल्या लक्षांत येणार नाहीं. सरकार लुळें करण्याच्या किंवा उलथून पाडण्याच्या उद्देशाचें एक हत्यार म्हणून कम्युनिस्टांनीं ट्रेड युनिअन चळवळ व्यापून टाकली, त्यामुळें सरकारला ट्रेड यूनिअन चळवळींत हस्तक्षेप करणें प्राप्तच झालें.








'इंटक'मध्यें दखील खुद्द पुष्कळच मतभेद आहेत. त्यामुळें 'इंटक'हि लोकसत्ताक राष्ट्राच्या सरकारला पाठिंबा देऊन देखील पुढेंमागें संपूर्णपणें स्वतंत्र आणि निर्भय अशी संघटना बनणें अशक्य नाहीं. 'इंटक' म्हणजे एक क्रांतिविरोधी अडगळ आहे, किंवा सरकारची ती हस्तक आहे असें मानणेंहि भयंकर मौलिक चूक होईल. 'इंटक' सरकारला पाठिंबा देते हें खरें, पण त्याबरोबरच हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं 'इंटक'मध्यें अशा पुष्कळच उपसंघटना आहेत कीं ज्या निर्भयपणें टीका करूं शकतात व आपल्या मनाप्रमाणें आपली प्रगतीहि करूं शकतात. एकंदरच जगांतील ट्रेड यूनिअन चळवळ ही हिंदी कामगारांशीं किती प्रमाणांत घनिष्ठ संबंध वाढवूं शकते आणि त्यांना संघटित करण्यांत किती मदत करूं शकते, यावरच 'इंटक'चें भवितव्य अवलंबून आहे. एक तर 'इंटक'ची संपूर्णपणें स्वतंत्र आणि स्वायत्त अशी संघटना म्हणून प्रगति होईल किंवा सरकारचें एक कामगारविषयक खातें म्हणून तिची परागति तरी होईल !

## औद्योगिक घटकांचे परस्परसंबंध

उद्योगक्षेत्रांतील घटकांच्या परस्परसंबंधांवर सरकारच्या धोरणामुळें अनिष्ट परिणाम होत आहेत. राष्ट्रीय आणि प्रांतिक मजूर-मंत्र्यांच्या हातांत ट्रेड युनिअन प्रतिनिधि नेमण्याबाबत आणि कामगारविषयक वाद मिटविण्याबाबत इतकी अतोनात सत्ता एकवटली आहे कीं मजूर मंत्री म्हणजे या बाबतींत 'झार'च झाला आहे ! पुष्कळसे कॉंग्रेस पुढारी आतां सरकारी अधिकारी झाले असूनहि स्वतःला ट्रेड युनिअन नेते समजतात आणि ट्रेड युनिअनचा कारभार आपल्या हातीं ठेवतात. त्यामुळें कामगारांच्या हितसंबंधांच्या बाबतींत आपल्या हस्तक्षेपाबद्दल लोक आक्षेप कां घेतात आणि आपल्या मजूर-विषयक हितदृष्टीबद्दल शंका कां घेतात हें त्या अधिकाऱ्यांना समजेनासें झालें आहे. अधिकाऱ्यांची अशी 'माबाप'–( paternalistic )–वृत्ति आणि कृति, आणि त्यांच्या जोडीला कम्युनिझमची धास्ती यांमुळें कामगारविषयक सर्व कारभारांत सरकारी वर्चस्व प्रस्थापित झालें आहे !

सरकारच्या औद्योगिक लवादयोजने ( system of industrial arbitration ) मुळें तर ट्रेड युनिअन चळवळ दुबळी होत चालली आहे. कारण त्या योगानें संप हे बेकायदा ठरविले गेले असून, औद्योगिक लवाद सक्तीचेंच होऊन बसलें आहे. कारखानदार आणि ट्रेड युनिअन्स यांची प्रवृत्ति संघटित मागणी करण्याकडे कमी कमी होत असून उठल्यासुटल्या ते सरकारकडे धांव घेत आहेत. औद्योगिक लवाद-योजना कितीहि चांगली व सर्वांगीण तयार केलेली असली तरी तिचा सध्यांच्या परिस्थितींत उपयोग हा घोड्याला गाडी जोडण्याइतका उफराटा प्रकार आहे. कारण औद्योगिक कायद्याच्या तंत्रपद्धतीचा उपयोग करण्यास लायख आणि कार्यक्षम अशी ट्रेड युनिअन संघटनाच अजून जोर धरूं शकलेली नाहीं.

## दडपशाहीचे कायदे

ट्रेड युनिअन चळवळींतील कम्युनिस्ट पक्षा-विरुद्ध सरकारनें दडपशाहीचें शस्त्र उगारलें आहे आणि कम्युनिस्टांनीं जे कट, घातपात आणि अत्याचार केले ते बघतां सुरक्षिततेच्या दृष्टीनें तसें करणें समर्थनीयहि आहे. समाजवादी पक्ष सरकार-विरोधी असूनहि त्यानें असें स्पष्ट केलें आहे कीं कम्युनिस्ट पक्षाच्या अत्याचारी धोरणाला दंडशक्तीनें समर्पक उत्तर मिळालें पाहिजे.

महान् दुस्तर अशा आर्थिक आणि सामाजिक समस्या आ वासून उभ्या आहेत. अशा प्रसंगीं जर कोणी सध्यांच्या परिस्थितींतील गोंधळाचा फायदा घेऊन सरकारविरुद्ध कट करून सशस्त्र प्रयत्नांनीं राज्यसत्ता काबीज करायचा आणि लोकसत्ता चिरडून टाकायचा खटाटोप करूं लागले तर सरकारनें आपल्या हातांतील असेल नसेल ती सत्ता वापरून त्यांचें पारिपत्य करणें समर्थनीयच ठरतें. परंतु कम्युनिस्टांविरुद्ध उचललेल्या दडप-शाहीच्या हत्याराचा वापर सर्रासपणें इतरांवरहि केला जात आहे. जे जे कोणी सरकारला विरोध





अनुक्रमणिका

करीत असतील किंवा 'इंटक 'शिवाय इतर मजूर-संघटनांचें काम करीत असतील तेहि या दडपशाहीच्या धोरणाखालीं भरडून निघत आहेत. या दडपशाहीच्या अविवेकी धोरणामुळें कम्युनिस्टांना आयतेंच फावेल. कारण त्यामुळें अनेक लोकसत्तावादी आणि समाजवादीहि बळेंच डाव्या पक्षाकडे झुकतील! सार्वजनिक सुरक्षितता कायद्याचें १४४ वें कलम जें आपद्धर्म-( emergency measure ) म्हणून वापरायचें, त्याचा उपयोग जर ट्रेड युनिअनचा सनदशीर कारभार आणि रीतसर सभा बंद करण्याकरितां होऊं लागला, तर नेमस्त वृत्तीचे लोक देखील जहालांना पाठिंबा द्यायला प्रवृत्त होतील. त्या योगानें कम्युनिस्टांचाच खेळ सरकार खेळत आहे असें होईल. कारण कम्युनिस्टांना तरी घातपात व अत्याचार करून हेंच व्हायला पाहिजे कीं मध्यम-मार्गीय चळवळ ( centre movement ) चिरडली जाऊन केवळ उजवे आणि डावे यांच्या मध्येंच निर्वाणीचा लढा व्हावा!

## आर्थिक आणि सामाजिक नरक

हिंदुस्थानांत लोकशाहीला जर खरा कोणता शत्रु दंड थोपटून आव्हान देत असेल तर ती जनतेची आर्थिक आणि सामाजिक परिस्थिति होय. ही परिस्थिति म्हणजे नरक आहे! जोंपर्यंत हिंदुस्थानात आर्थिक व राहणीचें मान इतकें निकृष्ट आहे, जोंपर्यंत कांहीं मूठभर सुखांत लोळणारे आणि अफाट जनता खितपत पडलेली यांच्यांत जमीन-अस्मानचें अंतर आहे, तोंपर्यंत हुकुमशाहीचें कायमचें उच्चाटन करणें अशक्यप्राय आहे. तांतडीचे प्रश्न हिंदुस्थानला सोडवायचे आहेत.पण चमत्कारिक विरोधाभास असा आहे कीं, एका बाजूला प्रश्न तर तत्काळ तांतडीनें सोडवायला पाहिजेत, पण ते सोडवायला दीर्घकालीन योजना पाहिजेत!

आशियांतील बहुतेक देशांप्रमाणें हिंदुस्थान-पुढेंहि अन्नाचा कूट प्रश्न उभा आहे: खाणारे खूप आणि खाद्य तर अत्यल्प! खाद्योत्पादन हा अगदीं निकडीचा प्रश्न आहे. तो साकल्यानें सोडवायचा म्हणजे त्याला अधिक औद्योगिक विकासाची आवश्यकता आहे. शेतीचीं अवजारें आणि हत्यारें, पाटबंधारे, आणि विद्युत्-शक्ति यांत भराभर वाढ झाली पाहिजे. परंतु ही वाढ करायची म्हणून ती कांहीं दिवस आणि महिने यांची गोष्ट नव्हे; त्याला वर्षानुवर्षें लागतील!– लक्षावधि लोक बिचारे घरादाराच्या अभावीं रस्त्यावर निजतात, त्यांना निवारा आतां लगेंच तांतडीनें द्यायला पाहिजे; परंतु लगेच कांहीं थोडेंफार करतां आलें तरी हा प्रश्न संपूर्णपणें सोडवायचा म्हणजे त्यालाहि एकंदर औद्योगिक अर्थव्यवस्थेंतच अधिक वाढ करण्याची व त्याकरितां दीर्घकालीन योजनेची जरूर आहे

ह्या निराशाजनक आर्थिक परिस्थितीच्या जोडीला कामगारजनतेच्या आरोग्याचें भयंकर निकृष्ट मान बघितलें तर छाती दडपून जाते. भूतदयेचा, माणुसकीचा दृष्टिकोन सोडूनच द्या; केवळ स्वार्थ म्हणूनहि विचार करतां या निकृष्ट आरोग्य-मानामुळें कामगारांची औद्योगिक उत्पादन-शक्ति कमी होत असून औद्योगिक प्रगतींत विघात होत आहे असें दिसेल. ज्यांचें वजन १०० पौंडांपेक्षांहि कमी आहे, अशा मजुरांना त्यांच्या शक्तीपलीकडील ओझीं उचलावीं लागतात! यंत्रांचा वाढता उपयोग आणि औद्योगिक संघटनांतील प्रगति यांमुळें अमेरिकेंतील मजुराला अशीं ओझीं उचलावीं लागत नाहींत. हिंदुस्थानांत उत्पादनशक्ति आणि उत्पादन यांत वाढ होणें आज अत्यंत आवश्यक आहे. पण पुष्कळशा कारखान्यांतून जुनाट यंत्रें काढून नवीन सुधारलेलीं यंत्रें बसविल्याशिवाय, कारखान्यांतून अधिक हवा आणि उजेड खेळल्याशिवाय ही वाढ होणें शक्य नाहीं. मुंबई आणि कलकत्ता येथें मी प्रत्यक्ष ज्या कापडाच्या व तागाच्या गिरण्या बघितल्या त्यावरून माझी अशी खात्री झाली.

वर वर्णन केलेली निकृष्ट आर्थिक पार्श्वभूमि ही, दंगे, अत्याचार, घातपात इत्यादि दहशतवाद आणि कम्युनिझम हे फोंफायला अगदीं उत्कृष्ट भूमि आहे.

राशियाच्या कक्षेंत असलेल्या देशांतून रहाणीचें मान निकृष्ट आहे. तेथील मजूर गुलाम

आहेत असें म्हणून तेथील अनिष्ट वस्तुस्थितीच्या वर्णनानें भेडसावून हिंदी जनतेला कम्युनिझमपासून परावृत्त करणें जमणार नाहीं. युरोप आणि अमेरिका यांजमधील मजुरांचें जीवन रशियन मजुरांच्यापेक्षां जास्ती सुखाचें असेल; परंतु हिंदी जनतेचें जीवनच इतकें निकृष्ट आणि भयंकर विपन्न आहे कीं, त्यामानानें रशियन मजूर सुखांतच आहे असें म्हटलें पाहिजे. शतकानुशतकें चालत आलेल्या या परिस्थितीनें हिंदी सरकारला आणि हिंदी लोकशाहीच्या पुरस्कर्त्यांना सतावून सोडलें आहे. एका बाजूला साधनांचा विधिनिषेध न बाळगणारे, आपलें साध्य कोणत्याहि मार्गानें गांठावयास उद्युक्त झालेले हुकूमशाही विचारसरणीचे लोक आहेत; दुसऱ्या बाजूला लोकशाही पद्धतीनें, शांततामय क्रमविकास, मार्गानें बदल घडवून आणणारे, गांधीजींची अहिंसा आणि नीतिमत्ता यांवर निष्ठा ठेवणारे लोक आहेत. या दोघांमध्यें झगडा चालू असून त्या झगड्याला वर वर्णन केलेल्या आर्थिक परिस्थितीच्या मर्यादा अर्थातच पडल्या आहेत.

## कारखानदार

बरेचसे उद्योगधंदे युरोपिअनांच्या ताब्यांत आहेत. त्यांनीं गेलीं कित्येक वर्षें खूप नफा मिळविला आहे. कांहीं कारखानदारांनीं अलीकडे तरी कामगारांची परिस्थिति सुधारण्याचा बराच प्रयत्न केला आहे हें नाकारून चालणार नाहीं. समाजसुधारणावजा ( welfare work ) असें कांहीं बरें कार्य झालें असून त्यांतून कारखानदारांची पालकत्वा ( paternalism ) ची मनोवृत्ति अनेक प्रकारें दिसून येते.

परंतु नवीन युगाची जी मुख्य मध्यवर्ती कल्पना ती पुष्कळशा कारखानदारांच्या नजरेंतून सुटली आहे. ती मुख्य कल्पना अशी कीं, आपणांस अधिक चांगली वागणूक मिळाली पाहिजे एवढीच कामगारांची अपेक्षा नाहीं; उत्पादन-पद्धतींतून जें निर्माण होतें तें आमचेंच असून, तें काय व कसें असावें हें ठरविण्याचा आम्हांला सर्वांनाच हक्क पाहिजे अशी त्यांची मागणी आहे. आहे त्यापेक्षां जास्ती मिळावें एवढीच नव्हे, तर समान हक्कहि आम्हांला मिळावेत अशी त्यांची मागणी आहे. हिंदुस्थानांतील मजुरांना हळूंहळूं त्यांच्या त्यांच्या परीनें अर्थव्यवस्थेंतील आपल्या सामर्थ्याची आणि महत्त्वाची जाणीव होत असून कारखान्यांतील व्यवस्थापक वर्गाबरोबर समान दर्जाची व हक्काची मागणी करण्याइतके ते जागृत होत आहेत, असें माझें मत झालें आहे. अर्थात् ही जाणीव हल्लीं कांहीं थोड्या कामगार-पुढाऱ्यांमध्येंच उत्कटपणानें आहे हें खरें; परंतु त्यांना सामान्य जनतेकडून पाठिंबा मिळणार हें नक्की. ज्या वेळीं कामगार आपल्या हातांतच नेतृत्व घेतील तो दिवस कांहीं लांब नाहीं. हिंदी कारखानदार आणि सरकार जर या गोष्टीकडे कानाडोळा करतील, तर लोकशाही सरकारला एक मोठाच धोका उत्पन्न होईल.

देशांतील उपलब्ध असलेली साधनसामुग्री लोकांच्या निकडीच्या गरजा भागविण्यास अपुरी आहे, हें हल्लींच्या हिंदी सरकारला अधिकाधिक स्पष्टपणें प्रतीत होत आहे. आजच लगेच, असा तांतडीचा प्रश्न नसता, तर हिंदुस्थान बाहेरची मदत न घेता स्वावलंबनानें शेवटीं आपला अभ्युदय करून घेऊं शकेल यांत शंका नाहीं. अर्थात् अशा स्वावलंबनमार्गानेंहि त्याला अतोनातच स्वार्थत्याग करावा लागून हल्लींच्या त्यागांत व हालअपेष्टांत असह्य अशी भर पडेल. परंतु हिंदुस्थानला सभोंवार वेढून टाकणारी राजकीय परिस्थिति इतकी भीषण आहे कीं बाहेरची मदत स्वीकारून हिंदुस्थानच्या आर्थिक पुनर्घटनेचा वेग शक्य तितका वाढवून काळावर मात करणें आज अगत्याचें होऊन बसलें आहे. रशियन हुकुमशाहीचें पाऊल या देशांत घुसावें याकरितां कांहीं चळवळ्ये अंतःस्थ यादवी माजवावयास उद्युक्त झाले आहेत. त्यांना गप्प बसवावयाचें असेल तर बाहेरची मदत घेऊन कां होईना देशांत आर्थिक स्वयंपूर्णता ( economic viability ) निर्माण करणें आवश्यक आहे. म्हणून अमेरिकेच्या कार्यक्रमांतील नं. ४ च्या








मदती ( fair deal )ला या देशाच्या दृष्टीनें अत्यंत मोठें महत्त्व आहे.

### समाजवादी पक्षाचा विरोध

१९४७ मध्यें स्वातंत्र्य मिळाल्यानंतर समाजवादी पक्षानें आपला स्वतंत्र मार्ग आखला आहे. असें करण्यानें समाजवादाचें पाऊल पुढें पडेल आणि एकपक्षीय हुकूमशाहीचा धोका टळेल असा त्यांना आत्मविश्वास वाटतो. या पक्षाचे नेते श्री. जयप्रकाश नारायण यांचा लोकप्रियतेमध्यें ( पहिले पं. नेहरू, दुसरे सरदार पटेल ) तिसरा नंबर लागेल. सरकारी किंवा काँग्रेस पक्ष सोडल्यास समाजवादी पक्षाइतका मोठा पक्ष दुसरा नाहीं. ट्रेड युनिअन चळवळींत समाजवादी पक्षानें महत्त्वाचें कार्य केलें असून, रेल्वे फेडरेशनमध्यें त्या पक्षाचेंच वर्चस्व आहे. ट्रेड युनिअन चळवळीबाबतच्या समाजवादी पक्षाच्या धोरणांत कामगारांमध्यें आपल्या राजकीय पक्षाचें वजन व संघटन कसें वाढवावें याच गोष्टीला प्रमुख स्थान आहे. ' हिंद मझदूर सभा ' ही संघटना उघडउघड समाजवादी पक्षाचें एक उपांगच आहे.

ट्रेड युनिअन चळवळीच्या अनेक जाणत्या पुढाऱ्यांना ' हिंद मझदूर सभे ' बद्दल सहानुभूति वाटते. तरी त्यांना असें वाटतें कीं समाजवादी पक्षानें आपली ट्रेड युनिअन राजकीय बनविण्यांत जरा अतिप्रसंगच केला आहे. काँग्रेस पक्षाची ' इंटक ' आणि समाजवादी पक्षाची ' हिं. म. स ' यांत फरक एवढाच कीं, पहिली अधिकारारूढ पक्षाची आहे, तर दुसरीचा पक्ष अधिकारारूढ नाहीं. मी समाजवादी पक्षाच्या ट्रेड युनिअन पुढाऱ्यांशीं जी चर्चा केली त्यावरून हा अभिप्राय चूक आहे असें मला वाटत नाहीं.

हिंदी समाजवादी पक्ष हा कम्युनिस्टविरोधी असून, कम्युनिस्ट पक्षाशीं त्याची संयुक्त आघाडी कधीहि होणें शक्य नाहीं. १९४८ सालीं समाजवादी पक्षाच्या अधिवेशनांत श्री. जयप्रकाश नारायण यांनीं म्हटलें होतें : " समाजवादी पक्षाचा जर खरोखरीच स्वातंत्र्य आणि लोकशाही समाजवाद यांवर विश्वास असेल, तर त्यानें कम्युनिस्ट पक्षाशीं सहयोग कटाक्षानें वर्ज्यच समजला पाहिजे."

तथापि, कम्युनिस्ट पक्षाचा या देशांतून जो अनुभव आला त्यामुळें कम्युनिझमला जरी विरोध दिसून येत असला, तरी सोव्हिअेट पद्धतीला उघडउघड विरोध दिसत नाहीं आणि त्या पद्धतीविषयीं भोळ्याभाबड्या श्रद्धा अजूनहि शिल्लक आहेत, असें दिसून येते. श्री. जयप्रकाश नारायण यांनीं तर बोल्शेव्हिझमला सडेतोड विरोध केला असून, " केवळ साध्य चांगलें आहे म्हणूनच साधनें चांगलीं ठरत नाहींत " असें म्हणून त्या पद्धतीला विरोध करण्यांत अलौकिक धैर्य दाखविलें आहे.

पण हिंदुस्थानांत अजूनहि कांहीं समाजवादी असें आहेत कीं जे " बूर्झ्वा ( मध्यमवर्गीय ) लोकशाही " आणि " प्रॉलिटेरिअन ( कामगारांची ) लोकशाही " असा फरक अजूनहि करतात. विशिष्ट तत्त्वप्रणालीविषयींच्या भक्तीच्या जोडीला ब्रिटिश राजवटीला राष्ट्रीय प्रतिकार करीत असतानाच्या वेळचा, खोल अंगांत भिनलेला एक प्रकारचा अलिप्ततावादहि दिसून येतो. अलिप्ततावाद आणि राष्ट्रवाद अशा दोन्हींच्या भोंवतीं मार्क्सिस्ट समाजसत्तावादाविषयींच्या अंधभक्तीचें जाड कवच—आवरण—अशा प्रकारची विचारसरणी सर्वत्र हिंदुस्थानभर दिसून येते. समाजवादी पक्षाच्या अधिकृत सभासदांशींच नव्हे, तर काँग्रेस पक्षाच्या परंपरागत समाजवादाच्या विचारांचा पगडा असलेल्या लोकांशीं जी मी चर्चा केली त्यावरून मला हीच विचारसरणी दिसून आली. "वर्गरहित समाज " " भांडवलशाहीला विरोध " ह्या कल्पना तर सर्व गटांतून- मग ते ' उजवे ' गट असोत, वा ' डावे ' असोत—दिसून येतात. रशिया-अमेरिका संघर्षांत हिंदुस्थाननें जें तटस्थतेचें धोरण स्वीकारलें आहे त्या धोरणाचें आवेशानें समर्थन करतांना पुष्कळशा समाजवादी नियतकालिकांतून इंग्लंड—अमेरिका—साम्राज्यवादी गटाला विरोध करण्यावर विशेष भर दिसून येतो. श्री. जयप्रकाश नारायण यांचें समाजवादी पक्षांत खूप वजन आहे. त्यांच्या व्यक्तिमत्त्वामुळें जागतिक प्रश्नांकडे अधिक वास्तवतापूर्ण आणि व्यवहार्य







अशा समाजवादी दृष्टीनें पहाण्याची आणि पाश्चात्यांची संस्कृति व लोकशाही यांमधून योग्य तें गुणग्रहण करण्याची संवय विचारवंतांना लागेल अशी आशा आहे.

## कम्युनिस्ट पक्ष आणि मजूरचळवळ

हिंदुस्थानांतील मजूर–चळवळीबद्दल विचार करतांना कम्युनिस्ट पक्षाच्या कार्याचा प्रामुख्यानें विचार केला पाहिजे. त्यांनीं फक्त हिंदुस्थानांतच चळवळ केली आहे असें नव्हे, तर हिंदुस्थानच्या भवितव्याशीं ज्यांचा संबंध आहे अशा ब्रह्मदेश, मलाया व चीन या देशांतहि त्यांनीं आंदोलनें उत्पन्न केलीं आहेत.

कम्युनिस्ट गेलीं कित्येक वर्षें कारखान्यांतील व शेतीवरील मजुरांमध्यें काम करीत असून त्यांत त्यांनीं आपली सर्व शक्ति ओतली आहे. आपल्या नेहमींच्या माथेफिरू आभिनिवेशानें अत्यंत दलित लोकांमध्यें जाऊन आणि त्यांच्यांत राहून त्यांनीं काम केलें आहे. ट्रेड युनिअन चळवळींत घुसून त्यांनीं ती हळूंहळूं काबीज केली असून शासनसंस्थेच्या स्थैर्यालाहि त्यांनीं धोका उत्पन्न केला आहे. प्रत्येक औद्योगिक आणि आर्थिक केंद्रामध्यें आपलीं जाळीं ( cells ) निर्माण करणें, त्या द्वारें कार्यकर्त्यांची संघटना करणें, आणि हिंदुस्थानांत अव्यवस्था आणि बेबंदशाही माजविणें हें त्यांचें उद्दिष्ट आहे. कम्युनिस्टांनीं आपली एक भक्कम आणि टणक अशी केंद्रवर्ती संघटना (core) निर्माण करावयाचें योजिलें आहे. ती संघटना ते अशी तयार करीत आहेत कीं, जी आगीच्या भडक्यांतून तावूनसुलाखून निघालेली आहे; रस्तोरस्तीं माजविलेल्या दंगलींतून निढावलेली आहे; बॉंब व घातपाती कृत्यें करावयास सदैव सरसावलेली आहे आणि जिचें डोकें सरकारच्या दडपशाहीमुळें द्वेषानें इतकें भडकून गेलेलें आहे कीं, त्यामुळें तिची मास्कोविषयीं आणि कम्युनिस्ट पक्षाविषयींची निष्ठा कधीं चळणेंच शक्य नाहीं !

कम्युनिस्ट चळवळीनें शक्य त्या प्रत्येक संधीचा असा कांहीं उपयोग केला आहे कीं ज्या योगें सरकार चिडीस यावें, क्षोभाची कढई सारखी खतखतत रहावी आणि अर्थव्यवस्था दुभंगून शासनसंस्थेला आपलें कर्तव्य करणेंहि अशक्यप्राय व्हावें ! गोंधळ माजविणें, सरकारला कोंडींत पकडून त्याला सर्वांगीण दडपशाहीच्या पद्धती अवलंबावयास आणि सर्व विरोधी लोकांस तुरुंगांत टाकावयास लावणें-या सर्व गोष्टी करण्यांत कम्युनिस्टांचा मुख्य हेतु राजकारणांतील मध्यममार्गीय ( middle of the way ) चळवळच अजीबात नेस्तनाबूत करणें हा आहे.

कम्युनिझमनें राष्ट्रवाद, सामाजिक क्रांति आणि परकीय व स्वदेशीय पिळवणुकीला विरोध या गोष्टींखालीं आपलें खरें स्वरूप दडवून ठेविलें असलें तरी त्याचा सर्व प्रयत्न एकाच मुद्द्यावर केंद्रित झाला आहे. त्याचा खरा उद्देश एकाच एका गोष्टीवर केन्द्रित करायचा आहे. ती गोष्ट म्हणजे कम्युनिझमविरुद्ध फॅसिझम हा लढा. त्यानें जी हिंसेची, अत्याचारांची आणि गुप्त भूमिगत चळवळींची मोहीम काढली आहे, त्या सर्व मोहिमेचा अर्थ हाच कीं, ही मोहीम रशियाच्या आशियाव्यापी कार्यक्रमाचा एक महत्त्वाचा भाग आहे. गांधींच्या अहिंसातत्त्वांत घोळलेल्या हिन्दी लोकांपैकीं बहुतेकांना कम्युनिस्टांच्या डावपेंचाचा आणि छद्मी उपायांचा तिटकारा आला आहे. परंतु कम्युनिस्टांना विजयाची आशा आहे. त्यांच्या विजयाची मदार त्यांच्या अंतःस्थ उपायांवरच केवळ नव्हे, तर आग्नेय आशियांतील विजयी कम्युनिस्ट राष्ट्रांच्या साहाय्यावरहि आहे. कारण त्यांना वाटतें कीं या बाहेरून मिळालेल्या साहाय्याला कोणतेंहि हिन्दी सरकार मज्जाव करूं शकणार नाहीं.

आपण पकडले जाऊं नये म्हणून हिंदी कम्युनिस्ट पक्षाचे नेते ब्रह्मदेशांत पळून गेले असून तेथील कम्युनिस्ट लष्करी संघटनेशीं ते संधान बांधीत आहेत. शिवाय कम्युनिस्टांचा डाव असा आहे कीं सरकारनें चिडून दडपशाही आणि हुकूमशाही गाजवावी; त्यांतून कोणताहि विरोधी पक्ष सुटूं नये आणि अशामुळें सतत गोंधळ, अव्यवस्था आणि लढा माजविण्याच्या आपल्या कार्यांत आपणांस अधिकाधिक जोडीदार मिळावेत.म्हणूनच हिंदी कम्युनिस्ट पक्ष हा लोकशाहीविरोधी आणि





अनुक्रमणिका

## हिंदुस्थानांतील ट्रेड युनिअन चळवळ

बाहेरच्या राष्ट्राचा धार्जिणा आहे असें हिंदी सरकार मानीत आहे आणि तें योग्यच आहे. म्हणूनच कोणताहि सच्चा ट्रेड युनिअन–अभिमानी –हिंदी वा हिन्देतर–'ऐटक'शीं संबंध ठेवूं इच्छिणार नाहीं. कारण 'ऐटक' ही संपूर्णपणें कम्युनिस्ट पक्षाच्या हातांत गेलेली आहे. परंतु त्याबरोबर हेंहि खरें कीं जे ट्रेड युनिअनवादी आपलें काम कायद्याच्या कक्षेत करीत असतील ते चालू सरकार-ला पाठिंबा देत असोत वा विरोध करीत असोत, त्या सर्वांना सरसकट सरकारनें दडपून टाकणें केव्हांहि शहाणपणाचें होणार नाहीं.

### अमेरिकेची मदत

जर लोकशाही आणि स्वतंत्र ट्रेड–युनिअन चळवळ जिवंत राखून कम्युनिझमविरुद्ध ती प्रभावी करायची असेल तर दडपशाहीनें भागणार नाहीं. अमेरिका या बाबतींत केवळ आपल्यांजवळील साधनसामग्री देऊनच नव्हे तर आपल्या स्वतंत्र ट्रेड–युनिअन चळवळीचा आदर्श पुढें ठेवून हिंदुस्थानला मदत करूं शकेल. 'अमेरिकन फेडरेशन ऑफ लेबर' या संस्थेचा प्रतिनिधि म्हणून जें माझें हार्दिक स्वागत झालें त्यावरून अमेरिकन ट्रेड–युनिअन कार्यकर्ते हिंदुस्थानांत अत्यंत महत्त्वाचें कार्य करूं शकतील, याबद्दल माझी खात्री झाली आहे. कम्युनिस्ट पक्ष वगळून बाकी सर्व गटांनीं आपापलें राजकारण किंवा गोऱ्या साम्राज्यवादाविरुद्ध असलेलें आपलें धोरण बाजूला ठेवून अमेरिकन ट्रेड युनिअन चळवळीबद्दल खूप आस्था दाखविली. सर्व हिंदी ट्रेड-युनिअन कार्यकर्त्यांचें ऐकमत्य दिसलें कीं, 'अमेरिकन फेडरेशन ऑफ लेबर'नें हिंदुस्थानांत एक कचेरी उघडून तिच्यातर्फे ट्रेड युनिअनविषयक वाङ्मय, सल्ला आणि कामगारांच्या शिक्षणाचा कार्यक्रम यांच्या द्वारें हिंदी ट्रेड-युनिअन्सना मदत करावी. मला वेळोवेळीं कितीतरी अत्यंत आशादायक तर निराशाजनक असे भिन्न भिन्न अनुभव आले आहेत. परंतु त्या सर्वांत हिंदी मजूर-पुढाऱ्यांकडून मी ज्या हार्दिक स्वागताचा अनुभव घेतला तो अनुभव अत्यंत आनंददायक आणि संस्मरणीय राहील यांत शंका नाहीं.

---

## तो राजा

फार फार पूर्वीची गोष्ट. एका नदीच्या काठीं एक नगर होतं. त्या नगराचा एक राजा होता आणि नगराचा एक नियम होता. दरेक राजानं पहिल्या वर्षी राज्य करायचं, दुसऱ्या वर्षी राज्य करायचं पण तिसरं वर्ष संपतांच राज्य सोडून नदीपलीकडच्या प्रदेशांत निघून जायचं अन् परत म्हणून त्या नगरांत यायचं नाहीं. कित्येक राजे त्या नगराच्या सिंहासनावर बसले आणि वेळ भरतांच नदीपलीकडे निघून गेले. जेव्हां प्रजेचा निरोप घेण्याची वेळ येई तेव्हां ते ढळढळा रडत; परंतु प्रजा मोठ्या खुषीनें निरोप देई; एका वर्षी एक बुद्धिमान् राजा गादीवर आला. सिंहासनावर बसतांच त्याच्या मनांत विचार आला— "मी काय केलं असतां हें सिंहासन सोडतांना काडीमात्रहि दुःख होणार नाहीं ? नदीपलीकडील देशांत गेल्यानंतर येथल्यापेक्षां अधिक आनंद कशामुळं होईल ?"

त्यानं एक दिवस विचार केला, दोन दिवस विचार केला; आणि तिसऱ्या दिवशीं त्याला एक छानदार युक्ति सुचली.

आणि रोज तो आपल्या स्वतःच्या ऐषआरामाची एकेक वस्तु नदीपलीकडे धाडूं लागला. आज एक वस्तु पाठवली, उद्या दुसरी, परवां तिसरी. दिवस जसजसे जात तसतशा ऐषआरामाच्या अधिकाधिक वस्तू नदीपलीकडे जात. अशीं तीन वर्षे उलटलीं, राजाला निरोप द्यायची वेळ आली परंतु त्याच्या डोळ्यांना दुःखाचं पाणी आलं नाहीं. उलट आनंदाच्या हास्यानं त्याचे डोळे विलसूं लागले.

तो मोठ्या खुशींत महालांतून बाहेर पडला आणि त्याच खुशींत नदीपलीकडे नेणाऱ्या होडींत जाऊन बसला. पण निरोप द्यायला आलेली त्याची प्रजा धाय मोकलून रडूं लागली.

—पंडित सुदर्शनजी. अनुवादक : सुधाकर








# हाच वारसा

अभावितेच्या अवकाशांतुन
झुळझुळणाऱ्या लाटांवरतीं
हासत यावा प्रकाश आदि
तसेंच अगदीं
तुझें आगमन.

खळखळणाऱ्या शृंखलांच्या
अफिणीनादीं अर्धसुप्तश्या
अणुरेणूंची झाली जागी
जीव—अस्मिता.
तुटले बंध निखळुन गेले
साखळदंड.
मुक्त त्यांतील विसाटलेले
रेणू कांहीं
पिशाचपिंगा घालुं लागले.
परंतु चटकन् फिरूं लागली
वयें वांकल्या सारंगीवर
थरथरणारीं तुझींच बोटें.
छेडुं लागलीं विश्वसंगीत
नितांततेनें एकतानलें;
आणि लागले शांत व्हावया
रक्तपिपासू रेणू सगळे.

अदृश्यांतिल तेजशलाका
काढुं लागल्या अनंतांतिल
फलकावरती गूढगूढशीं
अभिनव चित्रें मंगल स्वप्नं

परि अचानक—
विद्रूपतेच्या तमशून्यांनीं
भरुन टाकला सगळा अवकाश.
अर्धे छेडलें गान पोरकें
अर्धे रंगलीं सारीं चित्रें
उरलीं मागें—

गगनांमध्यें पिशाच्चगीतें.
क्षणाक्षणाला ऐकूं येतीं
भीषणतेचीं क्रूर पावलें
असहायतेचें मूक स्फुंदन.

तमअर्कांच्या तडकुन गेल्या विश्वामध्यें,
अपुरें गति. अपुरीं चित्रें
तुझींच सारीं
पुरीं करावीं—
उरला आतां हाच वारसा
हाच वारसा !

—य. द. भावे

# सुंदर स्वप्ना—

माझ्या मनिंच्या सुंदर स्वप्ना
येशिल का कधि होउन वास्तव—
मजभंवतींच्या जगतावरतीं
रंग आपुले सांडित अभिनव!

कधींतरी एकदां जीवाला
रडुनी थकुनी झोंप लागतां
सुंदर स्वप्ना, तुला देखिलें
नभि गहनतेवरी तरळतां!

तेव्हांपासुनि सख्या, मनाला
तुझा सदोदित छंद लागला
होइल साक्षात्कार कुठें तव
म्हणुनि धुंडितां जीव भागला!

मजभंवतींची कुरूपताही
तुझ्यामुळें मज सुसह्य झाली
तीव्र कालकूटासम दुःखें
तुजसाठीं मीं प्राशन केलीं!

जागृतींत वा निद्रेंतुनहि
तुझीच मी नित घेतें चाहुल
तृणांकुरावर पवन नाचतां
गमे वाजलें तुझेंच पाउल!

तव भासांनीं जीवन माझें
होउन गेलें सहज अलंकृत
सुंदर स्वप्ना, तुझ्यामुळें मज
जीवनमूल्यें दिसलीं शाश्वत!

अजुन जिवाला परंतु वाटे
प्रत्यक्षामधिं तुला बघावें
जीवन तुजवरुनी ओवाळुन
निर्माल्यापरि फेकुनि द्यावें

माझ्या उरिंच्या सुंदर स्वप्ना,
देशिल केव्हां मजला दर्शन!
दैन्य आणखी कुरूपता ही
स्पर्शें तव कधि जाइल उजळुन!

—शांता ज. शेळके



अनुक्रमणिका

श्री. वल्लभ स्वामी

# ओरिसांतील रचनात्मक कार्य : कांहीं व्यक्ती व केंद्रें

### दोन कालखंड

ओरिसा (उत्कल) मध्यें[1] गेल्या सुमारें ४५ वर्षांतील जनसेवेचें जें प्रत्यक्ष कार्य झालें त्या कार्याचें वर्णन करण्याकरितां 'रचनाकार्य' हा शब्द मी उपयोजीत आहे. या ४५ वर्षांचे दोन मोठे कालखंड पडतात : एक १९०४–५ ते १९१८–२० पर्यंतचा व दुसरा त्यानंतर आजपर्यंतचा. या दोन कालखंडांतील रचनाकार्याच्या बाह्यरूपांतहि स्पष्ट फरक दिसून येतो. १९०५ सालीं 'वंगभंगा'-ला विरोध करण्याकरितां जें आंदोलन झालें त्या वेळीं एका बाजूला दादाभाईंनीं 'आमच्या सर्व दुःखांवर स्वराज्य हेंच एक रामबाण औषध आहे' असें अचूक निदान केलें तर 'स्वराज्य हा आमचा जन्मसिद्ध हक्क आहे' असा मंत्र देणाऱ्या लोकमान्यांनीं स्वराज्य, बहिष्कार, स्वदेशी आणि राष्ट्रीय शिक्षण या चतुःसूत्रीचें प्रतिपादन करून त्यापुढचा सोपा मार्ग दाखविला. या चतुःसूत्रीमध्यें प्रत्यक्षांत आणण्यासारखें कार्य राष्ट्रीय शिक्षण हेंच होतें. म्हणून पहिल्या कालखंडांत चांगले चांगले लोकसेवक बहुतेक राष्ट्रीय शिक्षणाच्या क्षेत्रांतच काम करतांना आढळून येतात, तर दुसऱ्या कालखंडांत त्यांनीं दरिद्रनारायणाच्या प्रत्यक्ष सेवेला वाहून घेतलेलें आढळतें.

उत्कलमध्यें आतापर्यंत जें रचनाकार्य झालें आहे त्याचा विचार करतां, दोन व्यक्ती सारख्या नांवाच्या आपल्या डोळ्यांसमोर येतात. त्यांच्या-भोंवतीं सारें रचनाकार्य केंद्रित झालें आहे. त्या दोन व्यक्ती म्हणजे एक, कै. गोपबंधु दास; दुसरे श्री. गोपबंधु चौधरी. गोपबंधु दासांचें नांव मीं किती तरी वर्षांपूर्वी ऐकलें होतें. त्यांचें नांव माझ्या पक्कें ध्यानांत राहिलें तें त्यांच्या 'सत्यवादी विद्यालया'च्या नांवामुळें. बापूजींच्या 'सत्याग्रह आश्रमा'-सारख्या या 'सत्यवादी' शब्दानें माझें लक्ष वेधलें आणि आपल्या विद्यालयाचें असें नांव ठेवणाऱ्या पुरुषाबद्दल माझ्या मनांत एक प्रकारचें सादर कुतूहल निर्माण झालें; परंतु 'सत्यवादी' हें विद्यालयाचें विशेषण नसून गांवाचें नांव आहे हें मला, मी तेथें प्रत्यक्ष गेलों त्या वेळेस कळलें व माझ्या मनांतील भ्रम दूर झाला; परंतु हा झालेला भ्रमनिरास पहिल्या भ्रमाइतकाच गोड कसा ठरला हें पुढें दिसून येईल.

---

१ अखिलभारतसर्वसेवासंघाचें मुखपत्र 'सर्वोदय' या मासिकाच्या फेब्रुवारी १९५० च्या अंकांत 'सर्वसेवासंघा'चे मंत्री श्री. वल्लभस्वामी यांचा 'उत्कलका रचनाकार्य : कुछ व्यक्ति और केंद्र' हा लेख प्रसिद्ध झाला आहे, त्याचा वरील लेख हा अनुवाद आहे. सर्वोदय समाजाचें संमेलन यंदा ६ एप्रिल १९५० रोजीं अनगुल (ओरिसा) येथें भरणार आहे. त्या निमित्तानें उत्कलामधील रचनात्मक कार्यक्षेत्रांतील कांहीं व्यक्तींची व केंद्रांची माहिती वाचकांस खचित उद्बोधक वाटेल.

—का. सं.

## ओरिसांतील रचनात्मक कार्य : कांहीं व्यक्ती व केंद्रें

### खादीचा श्रीगणेशा

कै. गोपबंधु दास हे बालब्रह्मचारी होते. ते १९२५-२६ सालीं निधन पावले. त्यांचें प्रमुख सेवाकार्य म्हणजे 'सत्यवादी विद्यालय'. दुसऱ्या कालखंडांतील रचनात्मक कार्य आरंभण्याचा पहिला मानहि त्यांचाच आहे. या निमित्तानें मला एक मोठा बोधक प्रसंग घडलेला ऐकायला मिळाला. १९१९-२० ची ही गोष्ट असेल. बापूजींचा मुक्काम कलकत्त्याला होता. गोपबंधु दास यांनीं बापूजींना विचारलें : "बापूजी, आपण उत्कलमध्यें केव्हां येणार ?" बापूजींकडून कांहींच उत्तर मिळालें नाहीं. गोपबंधूंनीं पुन्हां विचारलें तरीहि बापू कांहींच बोलले नाहींत, तेव्हां गोपबंधु म्हणाले : "बापू! दोनदोनदां विचारतों तरी आपण कां उत्तर देत नाहीं ?" बापू म्हणाले– "उत्तर काय देऊं ? नीट रीतीनें बोलाव, म्हणजे येतो." ही 'रीत' कोणती ते गोपबंधु मनांत उमजले. उत्कलमध्यें येऊन त्यांनीं खादीकार्य सुरू केलें. कांहीं काळ लोटल्यावर बापूंनीं स्वतः होऊन लिहिलें : "अमक्या अमक्या वेळीं उत्कलला यायला मला सवड आहे."

गोपबंधु दास यांनीं वृक्षारोपण केलें, त्या वृक्षाचें सिंचन व विस्तार गोपबंधु चौधरी यांनीं केला. गोपबाबूंनीं (लिहायला सुटसुटीत नांव म्हणून गोपबंधु चौधरी यांना गोपबाबू असें मी पुढें म्हणेन) असहकारितेच्या चळवळींत आपली मॅजिस्ट्रेटची नोकरी सोडून दिली आणि त्यांनीं आपलें सारें कुटुंबच्या कुटुंब आजपर्यंत दरिद्रनारायणाच्या सेवेला वाहिलें आहे. गोपबाबू आणि त्यांची पत्नी रमादेवी यांना उत्कलचे कार्यकर्ते व जनता 'बाबाजी' आणि 'माताजी' म्हणतात. दरिद्रनारायणाचें बाह्य रूप भलें दारिद्री असो; पण खरोखरीचा तो 'नारायण'च आहे. त्याच्याच सारखे त्याचे सेवकहि आहेत. बाहेरून साधेसीधे खेडवळ पण आंतून मात्र सेवाकर्म, ज्ञान आणि भक्ति यांनीं परिपूर्ण.

### अनगुल

गोपबंधु आणि गोपबाबू यांचा परिचय करून दिल्यावर दुसऱ्या रचनात्मक कार्यकर्त्यांचा परिचय, यापुढें रचनाकेंद्रांचा परिचय करून देतांना येईलच. यंदाचें आगामी सर्वोदय-संमेलन ओरिसांतील अनगुल या गांवीं आहे. तेव्हां अनगुलपासूनच सुरू करतों. अनगुल हें कटक पासून सुमारें ६० मैल अंतरावर संबळपूरच्या बाजूला आहे. ओरिसांतील जंगलांची राखण करण्याकरितां नेमलेल्या नोकरांवर देखरेख करण्याचें मुख्य नाकें अनगुल येथें होतें. तेथें कमिशनरचें ठाणें असे. या कमिशनरला केवढी सत्ता होती व त्या सत्तेचा अंमल तो कसा करीत असे याची कल्पना पुढील उदाहरणावरून येईल : हरिजन-यात्रेंत बापूजी पायीं दौऱ्यावर निघाले असतांना अनगुलला आले. बापूजींना आपल्या घरांत उतरवून घेण्याला कमिशनरनें तेथील लोकांना मनाई केली होती. कमिशनरच्या परवानगीशिवाय कोणीहि कोणाकडेहि उतरूं शकत नसे. शेवटीं लोकांनीं एका झाडाखालीं तंबू ठोकून त्यांत बापूजींची उतरण्याची व्यवस्था केली. बापूजी तेथून निघून गेल्यावर लोकांनीं त्याच तंबूच्या चिंध्या चिंध्या करून प्रत्येक जण एक एक चिंधी बापूजींची आठवण म्हणून घेऊन गेला. अनगुलला एक मूलोद्योगी शाळा, 'नयी तालीम'चें सरकारी ट्रेनिंग स्कूल चालू आहे. कस्तुरबा ट्रस्टतर्फे भगिनींचें शिक्षण-केंद्र येथेंच होत आहे. या सर्व कार्यांचें संचालन गोपबाबूंचे बंधू नवबाबू चौधरी आणि त्यांच्या पत्नी मालतीदेवी हीं करीत आहेत.





अनुक्रमणिका

**' सवरा ' लोकांमध्यें**

अनगुलनंतर मी कुजेन्द्रीला गेलों. मागील अंकांत ' सवरा-जातीके बीच ' या लेखांत कुंजेन्द्री -केंद्रांत ' सवरा-जाती 'च्या लोकांकरितां काम करणारे भाई विश्वनाथ पटनाईक यांचा थोडा परिचय मीं दिला आहे.

**' साक्षी गोपाल '**

कुजेन्द्रींनंतर मी ' साखी गोपाल 'ला आलों. साखी गोपाल हें गांव पुरीच्या या बाजूला १० मैल अंतरावर आहे. हें गोपबंधु दास यांचें मुख्य कार्यक्षेत्र. त्यांचें सत्यवादी विद्यालय येथेंच आहे. आणि त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या स्मृतीप्रीत्यर्थ प्रस्थापित झालेला जो ' गोपबंधु दरिद्रनारायण सेवासंघ ' त्याचें मुख्य केंद्रहि याच ठिकाणीं आहे. बापूजींशीं बोलणें झाल्यानंतर गोपबंधूंनीं खादीचें कार्य याच जागीं सुरू केलें. आज तें कार्य श्री. होताजी यांच्या देखरेखीखालीं चाललें आहे. खादीच्या बाबतींत होताजींचा भर वस्त्रस्वावलंबनावर आहे. त्यांच्याशीं बोलत असतांना ते म्हणाले,

---

२ ' सर्वोदय ' च्या जानेवारीच्या १९५० च्या अंकांत उत्कलमधील सवरा लोकांसंबंधीं श्री. वल्लभस्वामी यांनीं एक लेख लिहिला आहे. त्याचा थोडक्यांत सारांश असा : " उत्कलच्या दक्षिण टोंकाला आंध्रला लागून कोरापुर नांवाचा जिल्हा आहे. उत्कलमधील हा सर्वांत मोठा जिल्हा असून त्यांतील बराचसा भाग जंगल आहे. ' सवरा ' लोक याच वनविभागांतून रहातात. ' सवरा ' शब्द संस्कृत ' शबर ' शब्दापासून आला असावा. शबर म्हणजे भिल्ल किंवा जंगलांत रहाणारे लोक. सवरा लोकांची गणना वन्य जातींत करतात; परंतु मला जो त्यांचा अनुभव आला, त्यावरून संस्कृतीच्या दृष्टीनें पाहतां त्यांना वन्य गणण्याचें कारण मला तरी दिसलें नाहीं. बाह्य स्वच्छतेची जाणीव त्यांच्यामध्यें चांगली आहे. मलमूत्रादि स्वच्छतेच्या बाबतींत त्यांची स्थिति इतर सभ्य लोकांसारखीच आहे. प्यायचें पाणी ते अत्यंत स्वच्छ अशा भांड्यांमधून भरून ठेवतात आणि तीं भांडीं बऱ्याच उंच जागीं ठेवतात. पाणी भांड्यांतून काढतांना देखील ते हात पाण्यांत बुडवणार नाहींत. प्यायचें पाणी ते ठरलेल्या पाणवठ्यावरून आणतात. कित्येक वेळां त्यांना त्याकरितां एक एक मैलहि जावें लागतें. पिण्याच्या पाण्याच्या बाबतींतील ह्या दक्षतेमुळें संक्रामक रोग पसरण्याची कमी शक्यता आहे आणि बहुधा याच कारणामुळें ही संवय त्यांनीं लावून घेतली असावी. विवाहादि प्रसंगीं त्यांच्यामध्यें जीं गाणीं म्हणतात त्यांपैकीं एखादेंदुसरें जें ऐकायला मिळालें त्यावरून त्या गाण्यांचा अर्थ ईश्वरस्तुतिपर होता. स्त्रियांचीं नांवें अनसूया, कमळा इत्यादि असतात. गांवांतून हिंडत असतांना मी एका सवरा माणसाच्या घरांत गेलों. घरांतील भगिनीनें दोन संत्रीं माझ्यापुढें ठेवून माझें स्वागत केलें. तीं संत्रीं तिनें चार मैल अंतरावरील बाजारांतून आणलीं होतीं. मी त्या बाईना ' तुमच्या मुलांकरितां तुम्ही संत्रीं घेतलीं असतील तीं तुम्ही ठेवा, माझ्या बरोबर मी जरूर तेवढीं संत्रीं आणलीं आहेत, तुमचीं तुम्ही परत घ्या ' असें म्हटलें तरी त्या भगिनीनें तीं परत घेतलीं नाहींत. पुढें जिज्ञासा म्हणून ' संत्रीं काय भावानें मिळतात ? ' असें मीं विचारलें, तर त्या भगिनीनें भावहि सांगितला नाहीं. त्यांची संस्कृति कोणत्या प्रकारची आहे हें या प्रसंगावरून कळून येतें. या वनविभागांत जे सवरा लोक रहातात त्यांची लोकसंख्या तीन लाख आहे. यांपैकीं बहुसंख्य सवरा लोकच आहेत. त्यांची स्वतःची अशी एक बोली आहे. तरी पण त्यांना उडिया भाषा समजते व ते ती बोलूंहि शकतात. हा भाग जंगल म्हणावयाचा. परंतु शबरीसारख्या साध्यासुध्या अशा या सवरा लोकांनीं आपल्यासारख्याच साध्यासुध्या अवजारांच्या आणि बैलम्हशींच्या मदतीनें जंगलांत मंगल निर्माण केलें

[ तळटीप पुढील पानावर चालू







# ओरिसांतील रचनात्मक कार्य : कांहीं व्यक्ती व केंद्रें

" मरायच्या दिवसापर्यंत ज्याचा चरखा चालत नाहीं, त्याला खादीची काय किंमत ! " खादीकार्याशिवाय येथें एक छोटासा महिलाश्रमहि चालू आहे. १९४२ च्या जेलयात्रेनंतर होताजींनीं हें कार्यहि आपल्या हातांत घेतलें. या कार्याबद्दलची तळमळ त्यांना जेलमध्यें असतांना लागली होती. महिलाश्रमांतील प्रमुख सेविकांपैकीं एक सोनामणिदेवी आहेत. त्या १९२८–३० मध्यें साबरमती आश्रमांत होत्या व तेव्हांपासून कांहीं ना कांहीं सेवाकार्य करीत आहेत. साखी गोपाळ येथील महिलाश्रमांत दहाबारा प्रौढ भगिनी जातपात, उच्च-नीच भाव हें सर्व विसरून एकत्र रहात आहेत. त्यांतील कांहीं भगिनी 'सवरा'जातीमधून आल्या आहेत. ६ किंवा १२ महिने येथें राहिल्यावर प्रार्थना, स्वच्छता, गृहोद्योग, अक्षरज्ञान इत्यादि संस्कार घेऊन जेव्हां त्या आपल्या घरीं परत जातात तेव्हां त्यांच्या जातीचे लोक आश्चर्यानें उद्गारतात— " छे ! ही आमची मुलगी नव्हे ! " इतका फरक त्यांच्या आचार–उच्चार–विचारांत त्यांना दिसून येतो.

---

तळटीप मागील पानावरून चालू ]

आहे. बैल तर इतके सालस आहेत कीं इतर प्रांतांतील बैलांप्रमाणें त्यांच्या नाकांतून 'नाथ' घातलेली दिसली नाहीं. चहूं बाजूंना दिसणाऱ्या शेतांमधून भरगच्च पिकें बघून 'शस्यश्यामला सुवर्णभूमि' हें नांव यथार्थ आहेसें वाटलें. या भोळ्याभाबड्या सवरा लोकांवर व्यापाऱ्यांनीं आणि सावकारांनीं आपले पाश आवळले आहेत. या पाशांत मुख्य फांस दारूचा आहे. मद्यपानबंदीचें आंदोलन सवरांमध्येंहि चालू असून सवरांना आपल्या अस्मितेची जाणीव झाली आहे. १९४२ च्या चळवळींत सरकारनें त्यांच्यावर दडपशाहीहि खूप केली. ५०–६० लोक गोळीबारांत ठार झाले. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर सवरा लोकांना आशा होती कीं त्यांची सावकारांच्या घरांत गेलेली जमीन परत मिळेल. परंतु अजून त्यांना यश न आल्यामुळें त्यांच्यांत असंतोष माजला असून गेलीं एक-दोन वर्षें सावकारांविरुद्ध अत्याचाराचें वातावरण उत्पन्न झालें आहे. भाई विश्वनाथ पटनाईक हे त्यांच्यांमध्यें गेलीं ८–१० वर्षें काम करीत असून हें अत्याचारी वातावरण वाढूं नये याबद्दल प्रयत्न करीत आहेत. सवरा लोकांच्या जीवनावरून, जीवन किती मर्यादेपर्यंत स्वयंपूर्ण असूं शकतें याचें दर्शन घडतें. सवरा शेती करतात; पिकलेल्या कापसांतून आपल्या कपड्यांकरितां लागणारा कापूस ठेवून घेतात; सूत घरोघर काढतात व 'पान' नांवाच्या हरिजन विणकऱ्यांकडून तें विणून घेतात. हल्लीं तेहि स्वतः विणकाम शिकले आहेत. खायचें तेल साध्या हत्यारांनीं व उपायांनीं घरोघर काढतात. मामुली सुतारकाम—झोंपडी किंवा खाट बनवायला लागणारें—त्यांना येतें. जोडे किंवा पायतण कोणीच वापरत नाहीं. मग कुठेंहि कांट्यांमधून काम करावें लागेना का ! त्यांच्या झोंपड्या १०० टक्के स्वदेशी आहेत. मला आठवतें कीं पुष्कळ वर्षांपूर्वी विनोबा म्हणाले होते कीं 'मला अशी झोंपडी बनवून द्या कीं जिला लोखंडाचा एक खिळा वा चूक लागलेली नाहीं.' विनोबांचें हें म्हणणें ऐकून मला आश्चर्य वाटे कीं, हें अगदीं अव्यवहार्य आहे; परंतु त्याचें प्रात्यक्षिक मला सवरा लोकांत दिसलें.' अर्थात सवरा लोकांच्या स्वयंपूर्ण जीवनावर आक्रमण होत आहे. फेरीवाले कावड घेऊन त्या कावडींतून मीठ, भुईमुगाच्या शेंगा ( चिनी बदाम), सिगारेट, कंगवा व आरसा इत्यादि माल घेऊन झोंपड्याझोंपड्यातून फिरतात. सहज विचारलें तर, १ तोळा कापसाच्या बदलीं दोन तोळे मीठ किंवा शेंगा देतात असें कळलें. सवरा लोकांमध्यें काम करणाऱ्यांचें मुख्य केन्द्र कुजेन्द्री हें आहे. कार्यकर्त्यांना एक मोठा त्रास सहन करावा लागतो; तो मलेरिआचा. श्री. विश्वनाथजी यांना तर मलेरिआनें पीडले आहे. पण अशा अडचणींनाहि सामना देऊन रस्ता काढण्यांत मौज आहे."





अनुक्रमणिका

## ' सत्यवादी'चें गूढ

या साऱ्या कार्यांत होतांजींना आचार्य हरिहरदासजींची मदत असते. जणुं ते एका शरीराचे दोन हात! दोन्हीहि गोपबंधु दासांचे सहकारी. आचार्य हरिहरदासजी आपल्या नांवाप्रमाणेंच विद्वान् आणि भक्तिभावपूर्ण सेवक आहेत. नाना गोष्टी आणि हकीगती यांचा तें मूर्तिमंत खजिनाच आहेत. 'सत्यवादी' विद्यालयाच्या बाबतींत माझा मधुर भ्रमनिरास आचार्यजींनींच केला. ती हकीकत अशी : तिकडलि कित्येक स्टेशनांवर, सहज दिसेल अशा ठळक जागीं, स्टेशनपासून अगदीं जवळांत जवळचा दवाखाना किती अंतरावर आहे, तें लिहिलेलें असतें. साखी गोपाळ स्टेशनवर मी संध्याकाळीं उतरतांच मला एक पाटी दिसली—" 'सत्यवादी' दवाखाना स्टेशनपासून अर्ध्या मैलावर." मला वाटलें, सत्यवादी विद्यालयाचा हा दवाखाना असावा. दुसऱ्या दिवशीं सकाळीं गांवांतून जात असतांना मला एक पाटी दिसली : 'सत्यवादी पोलिस ठाणें'; मला हंसूं लोटलें व मी विचार करूं लागलों कीं 'सत्यवादी'मध्यें कांहीं गौडबंगाल आहे खास! संध्याकाळीं आचार्य हरिहरदासना विचारलें. त्यांनीं सांगितलें : " या गांवाला दोन नांवें आहेत. सत्यवादी आणि साखी गोपाळ. बाहेर सर्वत्र साखी गोपाळ प्रचलित आहे; पण स्थानिक जनतेमध्यें सत्यवादी नांव रूढ आहे. वृंदावनच्या गोपाळाचें येथें एक मंदिर असून त्यांत त्याची अतिसुंदर मूर्ति आहे. त्याच्या सान्निध्यावरून हीं दोन नांवें पडलीं. वृंदावनचा हा गोपाल आपल्या कोणा भक्ताकरितां साक्ष देण्यासाठीं कांजीवरमूला गेला. पुढें पुरीच्या एका राजानें कांजीवरमूच्या राजाला जिंकून तेथून गणेश आणि गोपाल या दोघांनाहि आपल्या बरोबर आणलें. त्यांतील गणेशाला जगन्नाथाच्या मंदिरांत ठेवलें. पण गोपालला मात्र येथें ठेविलें. कारण त्याला कुंजवन पाहिजे ना!" अशा प्रकारें इतिहासमिश्र मजेदार दंतकथा हरिहरदासजींनीं सांगितली. साखी गोपालाच्या मंदिराजवळ दररोज तेथील झाडें कापलीं जात असतांहि आजहि खूप जंगल आहे. कै. गोपबंधु सृष्टिसौंदर्याचे महान् भोक्ते होते. याच वृक्षांच्या झाडींत सत्यवादी विद्यालय सुरू झालें. वड आणि इतर झाडें यांच्या छायेखालीं वर्ग चालू असत. आजहि कांहीं चालू आहेत. झाडी इतकी गर्द आणि दाट होती कीं, एका वर्गाचा अभ्यास चालू असतांना शेजारीं चालू असलेल्या दुसऱ्या वर्गाच्या अभ्यासांत व्यत्यय येत नसे. साध्या पावसाचा उपद्रव होत नसे. ऊन तर समजतहि नसे. शिक्षकाकरितां वीट-चुन्याची खुर्ची आणि मेज तयार करून ठेवलें होतें. १९०८ चा तो जमाना; त्या वेळीं गर्द झाडींत अभ्यास. सरकारला संशय येत असे कीं, येथें बॉंब तर हे तयार करीत नाहींत ना!

शाळेला, इमारतीच्या अभावीं, सरकारनें मान्यता द्यायचें नाकारलें. सरकारी मान्यतेकरितां इमारतीची व्यवस्था हळूहळू पुरी होऊन १९२७–२८ मध्यें गोपबंधूंच्या मृत्यूनंतर त्या विद्यालयाचें एक साधें हायस्कूल झालें. विद्यालयाचें असें रूपांतर झाल्याबरोबर आचार्यजी आदि मंडळी त्यापासून वेगळी झाली आणि दरिद्रनारायणाची सेवा खादी वगैरे कार्यद्वारें करूं लागली.

साखी गोपालापासून ४–५ मैलांवर सारंगखडी नांवाचें खेडें आहे. तेथें वस्त्रस्वावलंबन वगैरे कार्यक्रम थोड्या प्रमाणावर सुरूं आहेत. काम जरी थोड्या प्रमाणावर होत असलें तरी तेथें काम करीत असलेल्या एक निरक्षर बालविधवा भगिनी लक्ष्मीदेवी यांची कार्यनिष्ठा मात्र महान् आहे. गेल्या १८–२० वर्षांत त्यांनीं केलेल्या कार्याचा एकंदर इतिहास ऐकून मला परमावधीचा आनंद झाला. त्यांना हिंदी येत नव्हतें, मला उडिया येत नव्हती. तरी पण आम्हां दोघांमध्यें अंधपंगुन्यायानें हृदयरूपी आकाशवाणीद्वारें विचारविनिमय शक्य होऊन आमचें अडलें नाहीं.

## रचनात्मक कार्याचें विद्यापीठ

साखी गोपालपासून सुमारें १०–१२ मैलांवर डेलांग आहे. तेथें एकदां पूर्वी गांधीसेवासंघाचें अधिवेशन भरलें होतें. डेलांगला गांधीकुटीर असून तेथें वस्त्रस्वावलंबनाचें कार्य चालू आहे. साखी गोपालहून मी रामचन्द्रपुरला गेलों. साखी गोपालहून आधीं





अनुक्रमणिका

कटक; कटकपासून रामचन्द्रपुर ४०-४५ मैल लांब आहे. पण हा प्रवास करतांना विमानाशिवाय सगळ्या दळणवळणांच्या साधनांचा उपयोग करावा लागतो : रेल्वे, मोटर, बैलगाडी, होडी आणि पाय. गांधीजिनीं पायीं हरिजन यात्रा केली, तेव्हां ते याच रस्त्यानें गेले होते. रस्त्यांत जेथें जेथें गांधीजिनीं मुक्काम केला तें तें स्थान गोपबाबू मोठ्या सादर प्रेमानें दाखवित होते. मोटरनें जात असतांना एक भावनापूर्ण दृश्य दिसलें. खेडेगांवांतलि ३–४ मुलें शाळेला जात होतीं. त्यांच्यांतील एक ८–९ वर्षांची मुलगी धांवत आली. तिनें खालीं वांकून सडकेवरची धूळ उचलली व कपाळाला लावून नमस्कार केला. याचा अर्थ विचारला असतां गोपबाबूंनीं सांगितलें : "या रस्त्यानें यात्रेकरू जगन्नाथपुरीला जात असतात. तेव्हां या रस्त्यावरील धूळ उचलून जगन्नाथाला वंदन करण्याची इकडे प्रथा आहे." रामचन्द्रपुर एक लहानसें खेडें आहे. खेड्याजवळच पण खेड्यापासून वेगळें असें ब्राह्मणी नदीच्या कांठीं शांत वातावरणांत एक शिक्षणकेन्द्र निर्माण झालें आहे. त्या केंद्रांत मूलोद्योग शिक्षकांचें अध्यापनविद्यालय, मूलोद्योग शाळा, कस्तूरबा ट्रस्ट शिक्षणसंस्था आदिवासी सेवा-शिबिर वगैरे कार्यें करणाऱ्या संस्था केन्द्रित झाल्या आहेत. एक प्रकारें हें ओरिसांतील रचनात्मक कार्याचें विद्यापीठ किंवा गुरुकुल म्हणतां येईल. १९३७ मध्यें निरनिराळ्या प्रांतांतून कॉंग्रेस सरकारांनीं 'नयी तालीम' सुरू केली. १९३९ मध्यें कॉंग्रेस सरकारनें राजीनामा दिल्याबरोबर ओरिसा सरकारनें तें कार्य बंद केलें. तेव्हां रामचन्द्रपुर आणि त्याच्या आसपासचीं ८–१० गांवें येथील कार्यकर्त्यांनीं आपल्या शक्तीच्या भरंवशावर हें कार्य सुरू ठेवलें. जेथें पूर्वीं ओसाड नापीक जमीन होती, तेथें शेण, मलमूत्र यांचें खत घालून फुललेले हिरवेगार मळे; साधे पण स्वच्छ रस्ते आणि पायवाटा; मधून मधून असलेल्या स्वच्छ आणि नीटनेटक्या झोंपड्या;—अशी ही वस्ती म्हणजे हिंदुस्थानच्या सुस्त आणि सुप्त जनतेंत 'नवीन शिक्षण'द्वारें काय कायापालट होऊं शकतो याचें एक नमुनेदार उदाहरण आहे.

## पूरपीडित भाग

रामचंद्रपुराहून बरी गांव ३–४ मैलांवर आहे. बरी हें गोपबाबू आणि रमादेवी यांचें मुख्य ठाणें आहे. स्वाभाविकच तें उत्कलांतील रचनात्मक कार्याचें केंद्र आहे. गोपबाबूंचे चिरंजीव श्री. मनमोहनजी उत्कल-खादीसमितीचे मंत्री व सर्वोदय–समाज-समितीचे सदस्य आहेत. तेहि बरीलाच राहतात आणि साऱ्या कार्याचा दैनंदिन कारभार पाहात असतात. ओरिसाचे दोन भाग केले आहेत : एक, 'बांध बांधून पुराच्या उपद्रवापासून सुरक्षित ठेवलेला (प्रोटेक्टेड)', दुसरा 'पुरानें पीडलेला (फ्लडेड)'. पैकीं दुसऱ्या 'पूरपीडित' भागांत रामचंद्रपुर, बरी आदि गावें आहेत. ओरिसाच्या पायीं केलेल्या यात्रेंत जेव्हां बापूजी बरीला आले तेव्हां पुराचें पाणी किती उंच चढतें तें दाखविणाऱ्या खुणा बघून ते आश्चर्यानें उद्गारले: "ओहो! पावसाळ्यांत रस्त्यांतूनहि माझ्या डोक्यावरून, इतकें पाणी उंच जातें अँ!" अशा ठिकाणीं एका खेडुताच्या घरीं राहून एका १७–१८ वर्षांच्या मुलीनें—निर्मलादेवीनें ग्रामीण भगिनींची प्रसूतिसेवा आणि प्रेमसंपादन केलें आहे. नुकतीच गांववाल्यांनीं सूतिकागृहाला आवश्यक ती जमीन व पैसा यांची जमवाजमव केली आहे. निर्मलादेवींनीं प्रसूतिसेवेच्या ज्ञानाबरोबर मराठी भाषेचेंहि ज्ञान नागपूरला यमूताईंच्या सूतिकागृहांत राहून संपादन केलें आहे. पावसाळ्याच्या दिवसांत साध्या खेड्यांतूनहि मलादिविसर्जनाची खूप घाण होते; मग पूरपीडित भागांतून तर काय होत असेल तें विचारायलाच नको! गेल्या चरखा-जयन्तीला चरखा-संघानें कार्यकर्त्यांसमोर ८१-८१ कताई-मंडळें स्थापण्याबद्दलची योजना ठेविली होती. बरी गांवच्या कार्यकर्त्यांनीं ८१ कामचलाऊ पायखाने गांवांत बनविण्याचा निश्चय केला. इकडचे लोक आपल्या अंगणांत बांबू लावतात. दोन बांबू आणि सुताराची








रुपया सव्वा रुपया मजुरी, यांत पायखान्याचा सांगाडा तयार होतो. या कामांत कार्यकर्त्यांना ५० टक्के यश मिळालें आहे.

## मधुमक्षिकापालनद्वारा स्वावलंबन

बरीहून तीनचार मैलांवर रतलांग गांवीं श्री. शक्तिशेखर ग्रामसेवकाचें कार्य करीत आहेत. मधमाशा पाळून तद्द्वारें स्वावलंबी व्हायची त्यांची खटपट आहे. थोडीशी ते बागाईतहि करतात. गेल्या वर्षी सुमारें २०० रु., त्याच्या पाठीमागल्या वर्षी सुमारें १५० रु., मध विकून त्यांना मिळाले. गांवाहून वेगळ्या अशा हरिजन वस्तीजवळ ते जाणूनबुजून राहिले आहेत. पावसाळ्यांत तर चोहींकडे रस्त्यावर पाणीच पाणी होऊन जातें. लोक तर पाण्यांतच उस्याउम्या शौचविधी करीत असतात. छातीपर्यंत झालेल्या पाण्यांतून ये-जा केल्यामुळें शक्तिशेखरबाबू हिंवतापाचा त्रास ओढवून घेतात; तरी पण त्यामुळें त्यांची व त्यांच्या पत्नीची हिंमत कमी झालेली नाहीं. मी त्यांना बोलतां बोलतां सहज विचारलें "आपल्या पत्नीला हें जीवन पसंत आहे का ?" त्यांनीं सांगितलें : 'तिलाच विचारा,' त्याच वेळीं शकुन्तलाबहेन आपल्या आजारी मुलीस औषधोपचार करण्याकरितां, तिला घेऊन बरीला आल्या होत्या. त्यांना विचारल्यावर त्या म्हणाल्या : "मी तर लहानपणापासून रमादेवींच्या आश्रमांत त्यांच्या तालमींत वाढल्यें !" रतलांगला आठवड्यांतून एकदां शुक्रवारीं, भगिनींच्या कताईबरोबर सामुदायिक प्रार्थना होत असते.

## भद्रकमधील त्रिमूर्ति

बरीनंतर भद्रक हें गांव बालासार जिल्ह्यांतील एक व्यापारी केंद्र आणि भद्रकालीचें यात्रास्थान आहे. या गांवाला नवीनता आणि पवित्रता ही 'भक्त' जीवरामभाईंच्या तपस्येमुळें प्राप्त झाली आहेत. 'भक्त' हें विशेषण बापूजींनीं त्यांना दिलें. बापूजी कोणालाहि सांगत असत : "दरिद्र नारायणाचें दर्शन आणि सेवा कोणाला करावयाची असेल तर त्यानें उत्कलमध्यें जावें." हा त्यांचा आदेश ऐकून जीवरामभाईंनीं आपला व्यापारधंदा सोडून दिला व व्यापाराच्या कमाईचे एक लाख रुपये घेऊन ते भद्रक गांवीं येऊन राहिले. तेथें सुमारें १५ वर्षें सेवा करीत करीतच १९४१ सालीं त्यांनीं आपला देह ठेविला. त्यांच्या बरोबरच एक निरक्षर भगिनी पुरबाई ओरिसांत आली, ती अजून तेथेंच टिकून राहिली आहे. जीवरामभाई आल्यावर थोड्याच दिवसांनीं ईश्वरलाल भाई व्यास आले. ते आले केवळ ८ दिवसांकरितां, प्रारंभिक अनुभव घ्यावा म्हणून; परंतु आज १८ वर्षांवर काळ लोटला तरी त्यांचा ८ दिवसांचा वायदा पुरा झाल्याचें कोणी मानीत नाहीं. ते भद्रकमध्यें सेवाकार्य करीत आहेत. या तिघांनीं आरंभापासूनच ओरिसा न सोडण्याचा बापूजींचा आदेश पाळण्याची प्रतिज्ञा केली. कलकत्ता इत्यादी छोट्यामोठ्या शहरांतले गुजराती व्यापारी ग्रामवासी नारायणाला दरिद्री बनविण्याचें पाप करीत आहेत; त्या त्यांच्या पापाबद्दल दारिद्र्यनारायणाची सेवा करून प्रायश्चित्त घेणारी ही त्रिमूर्ति आहे !

भद्रकगांवांत एक खादीविद्यालय व एक बालाश्रम आहे. भद्रकपासून तिसरें किंवा चौथें स्टेशन सोरो आहे. कित्येक वर्षांपासून पुरबाई येथेंच सेवा करीत आहेत. त्यांचें वय झाल्यामुळें शरीराची शक्ति कमी झाली असली तरी सेवेचा उत्साह अजून कमी नाहीं. बापूजींनीं तर सांगून ठेवलें होतें कीं, "पुरबाई, आतां सेवा होऊं शकली नाहीं तरी त्याचें दुःख मानूं नका. भगवानाचें नांव घेऊन चरखा घेऊन बसून रहा. ओरिसा सोडूं नका." पुरबाईंनीं हा गुरुमंत्र शिरसावंद्य मानला आहे. छाती छातीभर पाण्यांतून खेड्यांतून कताई शिकविण्याकरितां तें जाणें, पुरुषांबरोबर तें बोलणें, भगिनींना भेटण्याकरितां घरांत शिरावें तों भगिनींनीं दार बंद करून घेणें वगैरे प्रारंभींच्या अनुभवांच्या कथा पुरबाईंच्या तोंडून ऐकल्यावर आणि तरीहि त्या ओरिसामध्यें ज्या अनन्यानिष्ठेनें टिकून राहिल्या आहेत ती त्यांची निष्ठा पाहिल्यावर वाटतें कीं पुरबाईंनीं साक्षरता आपल्या जीवनांत प्राप्त करून घेतली नसेल बापडी; पण त्यांनीं आपल्या जीवनाची सार्थकता करून

 23 C09

घेतली आहे खास! आणि हा विचार येऊन मनांतल्या मनांत त्यांना प्रणाम केल्याशिवाय राहवत नाहीं.

सोरोगांवीं नलिांबरबाबू हे एक स्थानिक कार्यकर्ते आहेत. ते १९२० सालापासून कॉंग्रेस इत्यादीमधून सेवाकार्य करीत आले आहेत. त्यांच्या देखरेखीखालीं, सोरोपासून ६–७ मैलांवर तुडगुडिया गांवीं, एक मूलोद्योग विद्यालय चालू आहे. त्यांत कांहीं उत्साही तरुण शिक्षक काम करीत आहेत. खेडेगांवचें वातावरण, शेतीकरितां जमीन, घरगुती उद्योग धंद्याकरितां लागणारी साधनसामुग्री या सर्व गोष्टींचा समुच्चय या ठिकाणीं साधला आहे. काम जर नीट पद्धतीनें चाललें तर हें एक चांगलें मूलोद्योगविद्यालय होऊं शकेल.

वरील केन्द्रें व त्यांतील कार्यकर्ते यांच्याशिवाय इतर कार्यकर्त्यांशींहि परिचय झाला. उत्कलमधील कार्यकर्त्यांची श्रद्धा व तपस्या पाहून आनंद होतो व त्यांना धन्यवाद देण्याची इच्छा होते.

## कांहीं वैशिष्ट्यें

उत्कलमधील रचनाकार्यांतील कांहीं वैशिष्ट्यें लक्षांत ठेवण्यासारखीं आहेत. जसें एखादा गरीब मनुष्य आपल्या जवळ असलेल्या लहान पुंजीचा जास्तींत जास्त काटकसरीनें उपयोग करीत असतो, अगदीं तशीच दृष्टि ओरिसामध्यें कार्यकर्त्यांचा उपयोग करून घेण्यामध्यें दिसून येते. पुष्कळ कार्यकर्त्यांना महारोग्यांना इंजेक्शन कसें द्यायचें हेंहि शिकविलें आहे; अशाकरितां कीं आपल्या दुसऱ्या सेवाकार्याबरोबर हेंहि काम त्यांना करतां यावें. मल-मूत्राची नीट व्यवस्था करणें, त्याचा खताकरितां उपयोग करून भाजीपाला निर्माण करणें हें दुसरें वैशिष्ट्य आहे. प्रत्येक केंद्राच्या कार्यकर्त्यांच्या घरीं हा विशेष आपणांला हमखास सांपडेलच. पुरबाई एवढ्या वयोवृद्ध झालेल्या असल्या तरी त्यांचें देखील असें परस आहे. आणखी एक विशेष म्हणजे ज्या कार्यक्षेत्रांत सेवा करायची त्या कार्यक्षेत्रामागील मूलतत्त्वें आचरणांत आणण्याची खटपट करणें हा होय. अस्पृश्यतानिवारणाचेंच उदाहरण पहा. बापूजी शेवटीं शेवटीं सांगत असत कीं, 'विवाहामध्यें वर किंवा वधू यांपैकीं कोणी हरिजन असेल तरच मी त्या विवाहाला आशीर्वाद पाठवीन!' ओरिसांत एका ब्राह्मण कार्यकर्त्यानें हरिजन मुलीशीं विवाह केला. त्यांना जातीचा विरोध होणें स्वाभाविकच होतें. तरी पण तो कार्यकर्ता आपल्या गांवींच राहिला. हल्लीं तर असें ऐकलें आहे कीं, त्या दांपत्यानें आपल्या सेवाभावानें व नम्रतेनें विरोध जिंकून लोकांचें प्रेम संपादन केलें आहे. याशिवाय खादीच्या बाबतींत कापसाची स्थानिक उपज करणें व घरोघर कांतणें व विणणें यांवर भर दिला जात आहे.

उत्कल खादीमंडलानें यां वर्षींच्या आपल्या बैठकींत असा ठराव केला आहे कीं, यापुढें बाहेरून कापूस मागवायचा नाहीं! गोपबाबूंसारखे अनेक लोक कित्येक वर्षांपासून आपल्या आवारांतच लावलेल्या कापसाचा उपयोग करीत आले आहेत.

उत्कलच्या कर्मभूमीचीं हीं अशीं वैशिष्ट्यें आहेत. रचनात्मक कार्यकर्त्यांच्या साधनेचीं तीं मूर्तिमंत प्रतीकें आहेत.

---

## प्रत्येकाला न्याय

कोणत्याहि लोकसत्तावाद्यानें 'व्हाइटहॉल' पहाणें चुकवूं नये. तेथें एका टोंकाला शिरश्छेद केलेल्या राजाचा पुतळा त्याला दिसेल; तर दुसऱ्या टोंकाला ज्यांनीं तो शिरश्छेद केला त्यांचीं स्मारकें दिसून येतील. प्रत्येकालाच न्याय द्यायचा प्रयत्न करावयाचा याचें हें आमचें उदाहरण आहे.

—सर एडवर्ड ॲपलटन

प्रा. श्रीकृष्ण के. क्षीरसागर

# डॉ. केतकर यांचे राजकारणविषयक विचार

डॉ. केतकर यांच्या बाराव्या स्मृतिदिनानिमित्त त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या आणि विचारांच्या आकलनांतील अडचणींचा विचार गेल्या वर्षी मीं 'नवभारता 'च्या द्वारें केला होता. डॉ. केतकर यांस सामान्यतः समाजशास्त्रज्ञ आणि संशोधक समजण्यांत येतें; तथापि त्या क्षेत्रांतील त्यांचे विचारहि विद्वानांना बुचकळ्यांत कां पाडतात, याचा विचार मीं माझ्या मागील लेखांत केला होता. केतकर यांस राजकीय पुढारी म्हणून मान्यता नव्हती. किंबहुना राजकीय क्षेत्रांतील त्यांच्या कृती आणि उक्ती पुष्कळदां हास्याचा विषय होत. त्या त्या काळांतील राजकीय आवडीनिवडींशीं केतकरांचे विचार व आग्रह जुळण्यासारखे नसत. खेरीज पुष्कळांना संशोधक पंडितांचा राजकारण हा प्रान्त नव्हे, असेंहि वाटत असे.

## राज्यशास्त्राचे अध्यापक

केतकरांचा हा विषय नव्हे, असें मात्र म्हणतां येण्यासारखें नव्हतें, हें अनेकांस माहीत नसे. केतकर यांचा अध्ययनाचा विषय राजनीतिशास्त्र हा होता. इतकेंच नव्हे, तर कलकत्ता विद्यापीठांत ते Political Science या विषयाचे अध्यापकहि होते. अर्थात् या क्षेत्रांत लिहिणाऱ्या अगर वर्तणाऱ्या अनेक लोकांहून केतकरांचें शासनशास्त्रीय ज्ञान अधिक होतें. भारतीय राजकारण, भारतीय अर्थशास्त्र, भारतीय धर्मशास्त्र, समकालीन राजकारण वगैरे विषयांवर त्यांनीं अनेक ग्रंथहि लिहिलेले आहेत. प्रत्यक्ष राजकारणांत भाग घेणें हें आपलें काम नव्हे, असें केतकर स्वतः तरी समजत नसत. त्यांनीं १९२७ सालीं 'Self-Determination League' नांवाची संस्था राजकीय कार्य करण्याकरितां स्थापन केली; व तिच्या विद्यमानें स्वयंनिर्णयवादी लोकांची एक परिषद् भरविण्याचाहि प्रयत्न १९३३ सालीं केला. त्या परिषदेला स्वतः केतकर आणि सातारा येथील पुढारी दादासाहेब करंदीकर या दोघांखेरीज फारसें कोणी हजर नसल्यानें, विशेष कामकाज न करतां ती बरखास्त करावी लागली असें स्मरतें. सेक्रेटरी ऑफ् स्टेटवर कायदेशीर फिर्याद लावण्याचा त्यांचा विचार, अद्यापि महाराष्ट्रीयांच्या स्मरणांत असेल! या सर्व प्रयत्नांत राजकीय ज्ञानाचा व शहाणपणाचा भाग किती, प्रचाररूप फळ किती, आणि केतकरी अतिरेक किती, हें ठरविणें फलप्रद होईल. केतकरांच्या या राजकीय उद्योगामुळें कित्येकांस आंग्ल कवि शेली यानें आयर्लंडमध्यें राजकीय क्रान्ति घडवून आणण्याकरितां वाटलेल्या जाहीरनाम्याचें स्मरण होईल! तथापि या सर्व बाह्यतः हास्यकारक वाटणाऱ्या राजकारणाच्या बुडाशीं, केतकरांची एक राजकीय विचारप्रणाली असे, व तिचा विचार करणें केवळ केतकर-चरित्राच्याच दृष्टीनें नव्हे, तर राजकीय तत्त्वांच्या अभ्यासाच्या दृष्टीनेंहि उपयुक्त होण्यासारखें आहे. केतकरांच्या समाजशास्त्रीय सिद्धान्तांकडे, इतिहास-संशोधनाकडे, कादंबरी-लेखनाकडे व वैयक्तिक विक्षिप्तपणाकडे, जेवढें लक्ष्य पुरविलें गेलें आहे, तेवढें त्यांच्या राजकीय कार्याकडे अगर राजकीय ग्रंथलेखनाकडेहि पुरविण्यांत आलेलें नाहीं. बहुधा त्यांच्या राजकीय आचारांचा आणि विचारांचा अंतर्भाव त्यांच्या विक्षिप्तपणांतच करण्यांत येत असावा!






# डॉ. केतकर यांचे राजकारणविषयक विचार

## वास्तववादी आणि आधुनिक दृष्टि

केतकरांच्या राजकीय लिखाणाचा, विचार-प्रणालीचा, अगर कृतीचा संपूर्ण आढावा घेण्याचें हें स्थळ नव्हे. केतकरांच्या राजकीय विचारांचा अभ्यास करणें आजहि उपयुक्त होईल, एवढें दाखविणें एवढाच या लेखाचा उद्देश आहे. केतकरांच्या राजकीय विचारांत स्थूल मानानें तीन अवस्था दिसतात. अगदीं प्रारंभीं–अमेरिकेला जाण्यापूर्वीं, तत्कालीन तेजस्वी महाराष्ट्रीय तरुणांप्रमाणें ते दहशतवादी होते; आणि बॉंबचें रहस्य शिकण्याकरतांच अमेरिकेंत गेले होते. तेथें त्यांच्या विचारांत क्रान्ति झाली; आणि हिंदुस्थानच्या सुशिक्षितांच्या विचारांत क्रान्ति झाल्याशिवाय–म्हणजे पुढाऱ्यांच्याच विचारांतील मागसलेपणा कमी झाल्याशिवाय देशांत खरी स्वातंत्र्याची चळवळ होणार नाहीं असें त्यांस दिसून आलें. राष्ट्राच्या शिक्षणाचा पाया म्हणूनच त्यांनीं ज्ञानकोश-लेखनाचें कार्य हातीं घेतलें. पण तें हातीं घेण्यापूर्वींच भारतीय जातिसंस्था, भारतीय धर्मशास्त्र, भारतीय अर्थशास्त्र व अर्वाचीन भारतीय राजकारण, यांसंबंधीं ग्रंथ व प्रबंध त्यांनीं लिहिलेले आढळतात. ज्ञानकोश हातावेगळा होतांच, पुढील आयुष्य स्वराज्यप्राप्तीच्या प्रयत्नांत खर्चीं घालावयाचें, असा संकल्प त्यांनीं जाहीरहि केलेला होता. त्याकरितांच त्यांनीं ‘ स्वयंनिर्णयी संघ ’ स्थापन केला; व त्या संघाच्या प्रयत्नानें १९२९ सालीं ‘ डोमिनिअन् स्टेटस् ’ प्राप्त करून घेण्याचा त्यांचा उद्देश होता. ज्ञानकोश हातीं घेण्यापूर्वीं त्यांनीं अर्वाचीन भारताच्या राष्ट्रीयत्वविषयक प्रश्नांसंबंधीं सशास्त्र आणि अभिनव विचार मांडले; प्रत्यक्ष ज्ञानकोशांत त्यांनीं युद्धोत्तर जागतिक राजकारणासंबंधीं आधुनिक आणि आन्तरराष्ट्रीय दृष्टिकोनाचे विचार ग्रथित केले; आणि ज्ञानकोश हातावेगळा होण्याच्या सुमारास युद्धोत्तर भारतीय राजकारणाचा रोख ध्यानीं घेऊन ‘ निःशस्त्रांच्या राजकारणा ’ संबंधींचे आपले सिद्धान्त मांडले. येथपर्यंतच्या त्यांच्या लेखनांत शास्त्रशुद्धता, आशावाद आणि वास्तववाद यांचा एक विशिष्ट क्रम दिसून येतो. त्यांचे राजकीय विचार आमच्या राजकारणी लोकांच्या वाचण्यांत अगर चर्चेंत येत. तथापि तत्कालीन राजकीय कार्यकर्त्यांनीं ते वाचले असते, तर त्यांना त्यांतील पुष्कळसे सिद्धान्त आणि कार्यक्रम स्वीकारण्यासारखेच वाटले असते.

१९३५ चा ‘ गव्हर्नमेंट ऑफ इंडिया ॲक्ट ’ मंजूर झाल्यानंतरचे त्यांचे विचार व कृति मात्र त्यांच्या देशबांधवास अधिकाधिक गूढ वाटूं लागलीं. त्या कायद्यानें, देशाला स्वराज्य मिळालें आहे, असें केतकरांचें मत होतें– आणि त्या कायद्यानंतरहि स्वराज्याच्या अगर स्वातंत्र्याच्या चळवळी करणारे लोक लबाड अगर मूर्ख ( अगर दोन्ही ! ) आहेत, असें ते प्रतिपादीत असत. शिवाय स्वराज्य मिळालें, तें आपल्या ( केतकरांच्या ) प्रयत्नानें मिळालें असेंहि ते म्हणत. त्यामुळें तर सर्वसाधारण मनुष्याला हा सर्वच प्रकार छांदिष्टपणाचा किंबहुना भ्रान्तिष्टपणाचा वाटूं लागे ! पण केतकरांच्या या शेवटच्या राजकीय अवस्थेंत छांदिष्टपणाचा अथवा ‘ monomania ’ चा भाग होता, असें धंदेवाईक पुढाऱ्यांच्या मुरवतीखातर क्षणभर मान्य केलें, तरी तत्पूर्वींच्या अवस्थांतील त्यांच्या लिखाणाचा उपयोग अगर विचार राजकीय क्षेत्रांतील लोकांनीं कितपत केला हा प्रश्नच आहे. जातिभेद आणि एकराष्ट्रीयत्व यांचे परस्परसंबंध, ब्रिटिश अंमलांतील हिंदुस्थानचें आर्थिक धोरण, युद्धोत्तर जगांतील हिंदुस्थानचे संबंध, वगैरे प्रश्नांच्या बाबतींत संपूर्णतया वास्तववादी आणि शंभर टक्के आधुनिक दृष्टि ठेवण्याच्या बाबतींत कोणताहि तत्कालीन पक्ष केतकरांची बरोबरी करूं शकला असता, असें वाटत नाहीं. प्रत्येक पक्षाचे म्हणून कांहीं लाडके अपसिद्धान्त असत, आणि त्या अपसिद्धान्तांतून आपल्या विचाराग्रणींची मुक्तता करण्यांतच केतकरांचें बहुतेक लिखाण खर्चीं पडे. कधीं कायद्याच्या कैचीमुळें, तर कधीं मतदारांच्या मुरवतीमुळें, तर कधीं केवळ पुराणप्रियतेमुळें, तर कधीं ऐतिहासिकतेमुळें आपल्या तत्कालीन राजकीय विचारप्रणालींत चोरटेपणा, दुटप्पीपणा आणि मागसलेपणा दिसून येत असे. वास्तविक सशस्त्र बंड हाच सर्वोत्तम स्वातंत्र्ययत्न होय, पण त्यासंबंधीं बोलणें देखील शक्यतों टाळलें पाहिजे, अशी वृत्ति बहुतेक राष्ट्रीय वृत्तीच्या सुशिक्षितांत दिसे. “ स्वराज्य म्हणजे परकीयांची हकालपट्टी. ” “ इंग्लंड व हिंदुस्थान या दोन










अनुक्रमणिका

राष्ट्रांत हितविरोध आहे. व म्हणून इंग्रज लोक खुषीनें वा सामोपचारानें स्वराज्य देणें कधींच शक्य नाहीं." "खरें म्हणजे पूर्ण स्वातंत्र्यच. हवें; पण वसाहतीचें स्वराज्य मागायचें तें केवळ आपली मागणी बेकायदा अगर फाजील जहाल ठरूं नये, म्हणून!" वगैरेसारखे समज तत्कालीन राष्ट्रीय पक्षाच्या कार्यकर्त्यांत दिसून येत. या दुहेरी अगर चोरट्या विचारमालिकेंतून या पक्षाची सुटका करण्याचा व्यापक प्रयत्न महात्मा गांधींनींच प्रथम केला. महात्मा गांधींच्या मूळ विचारप्रणालींत दुहेरीपणा नव्हता; परंतु त्यांचे पुष्कळसे सिद्धान्त, सामान्य व्यवहारी मुत्सद्द्यास अगर देशभक्तांस पटण्यासारखे नव्हते. व त्यामुळें फिरून त्यांच्या अनुयायांत अन्यमार्गानें हा चोरटेपणा शिरलाच. पूर्वी दुय्यम दर्जाचे पुढारी कायद्याच्या भीतीनें 'हातचें' ठेवून (with mental reservations) बोलत; तर गांधीयुगांतील दुय्यम दर्जाचे पुढारी, गांधींचें असामान्य पुढारीपण गमावण्याच्या भीतीनें आपले खरे विचार बोलण्यास घाबरत!

कायद्याच्या भीतीमुळें, गांधींच्या भक्तीमुळें, अगर केवळ राजकीय मागसलेपणामुळें राजकीय क्षेत्रांत जे अपसिद्धान्त, अगर असत्य विचार प्रसार पावत होते, त्याजकडे धीट डोळसपणानें पाहण्यास शिकविणें, हें केतकरांच्या उत्तरकालीन लिखाणाचें उद्दिष्ट होतें.

## अनत्याचारी चळवळीचें सुंदर तत्त्व

साधा, चळवळीच्या सनदशीरपणाचाच प्रश्न घेऊं. नेमस्त लोक सनदशीरपणाला जणुं धर्मप्रतिष्ठेचें अगर पातिव्रत्यव्रताचें स्थान देत; तर टिळकपक्षीय लोकांच्या सनदशीरपणाच्या ग्वाहींत अश्रद्धेचा– किंबहुना 'सिनिसिझम्' चा सूर ऐकूं येई. केतकर अर्वाचीन राजकारणाचें पृथक्करण करतांना आरंभींच सांगतात: "यशस्वी युद्धास लागणाऱ्या अवश्य गोष्टी काय आहेत, त्यांपैकीं आपणांस काय साध्य आहेत, त्यांविषयीं विचार आज अनेक वर्षे होऊन, युद्ध करून स्वातंत्र्य मिळविणें अशक्य आहे या मतास मी पोंचलों आहें." "सशस्त्र युद्धाचा प्रयत्न करणें हें सामान्य मध्यमवर्गातील नागरिकांचें काम मुळींच नाहीं." "प्रथम बाहेर देशाहून दारूगोळा आणूनच युद्ध करावें लागणार, आणि त्या दारूगोळ्याबद्दल पैसे देण्याची ऐपत पाहिजे. शिवाय, दारूगोळा इंग्रजांच्या तावडींत न सांपडतां पोंचला पाहिजे, आणि जी फौज लढणार तिला वेळच्या वेळेवर पगार देण्याची ऐपत पाहिजे, आणि तो पगार देतां यावा म्हणून सर्व लोकांचे व्यवहार सुरळीत चालूं ठेवून कर गोळा करीत राहण्याची शासनविद्या पाहिजे..." वगैरे सर्व तपशिलाचा उल्लेख करून त्यांनीं सशस्त्र युद्ध अशक्य ठरविलें आहे–व पुढें "तर आपण आपल्या उन्नतीची आणि प्रगतीची आशाच सोडून द्यावी काय?" असा प्रश्न विचारून "आपणांस अवश्य असलेलें स्वातंत्र्य निःशस्त्रोपायांनीं मिळण्याजोगें आहे–" असें उत्तर दिलें आहे. इतकेंच नव्हे तर महात्मा गांधींच्या चळवळींतील गुणदोष सांगतांना त्यांनीं "सरकारविरुद्ध जी चळवळ करावयाची ती अनत्याचारी असली पाहिजे हेंहि सुंदर तत्त्व त्यांनीं (गांधींनीं) आवेशानें व बऱ्याच यशस्वीतेनें लोकांपुढें मांडलें–" हेंहि निःसंदिग्धपणें कबूल केलें आहे. तथापि, 'अहिंसा' हें एक स्वतंत्र ध्येय म्हणून मानणें, आणि तेंहि राजकीय लक्ष्याच्या क्षेत्रांत मानणें, ही गोष्ट सामान्य लोकांच्या आटोक्याबाहेरची होती. कांहीं लोकांनीं तो एक अशक्यप्राय ध्येयवाद म्हणून पत्करला; तर कांहींना त्यांतील अशक्यप्रायता तितकीशी न कळल्यामुळें त्यांच्या मनांत खोटा उत्साह आणि अहंकार उत्पन्न झाला. पण केतकरांचा निःशस्त्र राजकारणावरील विश्वास जागतिक राजकारणाच्या अवलोकनावर आधारलेला होता.

## स्वराज्याची केतकरांची व्याख्या

तसेंच ते स्वराज्यप्राप्तीकडे अनेकविध राष्ट्रीय उन्नतीचें साधन म्हणून पाहात; केवळ जन्मसिद्ध हक्क म्हणूनहि पहात नसत, कीं राष्ट्रीय स्वाभिमानाची बाब म्हणूनहि पहात नसत; किंबहुना, सामान्य राजकीय पुढाऱ्याला 'स्वराज्य तुला कोणत्या राष्ट्रहितपर गोष्टी करण्याकरितां हवें?–' म्हणून विचारलें, तर त्याला उत्तर देतां येणार नाहीं, असें मत त्यांनीं व्यक्त केलें आहे. सामान्य लोकांस आपलें हित कळतें; आणि स्वराज्याची

# डॉ. केतकर यांचे राजकारणविषयक विचार

मागणी करणारांनी ती कारकून-वर्गाच्या हिताकडे दृष्टि ठेवून चालविली असल्यानें, शेतकरी व मजूर-वर्ग त्यासंबंधीं उदास असला तर त्यांस दोष देतां येणार नाहीं, असेंहि त्यांनीं बजावलें आहे व शेवटीं त्यांनीं केतकरी पद्धतीनें एक लोकविलक्षण, पण अत्यंत विचारप्रवर्तक अशी स्वराज्याची व्याख्या सांगितली आहे : 'सामान्य जनतेचा आपल्या समाजांत मध्यम वर्गावर इंग्रज लोकांपेक्षां अधिक विश्वास उत्पन्न होईल, अशी स्थिति येऊं लागली, म्हणजेच स्वराज्याचा जन्म झाला असें मी समजेन.'

या व्याख्येप्रमाणें अद्यापहि हिंदुस्थानास स्वराज्य-प्राप्ति झालेली नाहीं, असें म्हणण्यांत केतकरांना गांधींनीं दुजोराच दिला असता असें मला वाटतें ! या बाबतींत दोघेहि सारखेच 'सत्याग्रही' व म्हणूनच 'आग्रही' होते. केतकर म्हणत कीं सामान्य जनतेला जर पांढरपेशांच्या राज्यापेक्षां इंग्रजांचें राज्य चांगलें वाटत असेल तर त्यांनीं तसें उघडपणें जाहीर करण्यांत गैर कांहींच नाहीं. केवळ लोकलज्जेखातर त्यांनीं सुशिक्षित मध्यम वर्गीयांवर विश्वास आहे असें म्हणणें, त्यांना मुळींच पसंत नव्हतें !

टिळक 'स्वराज्य हा जन्मसिद्ध हक्क आहे' असें म्हणत; तर गांधी 'स्वातंत्र्य हा चुका करण्याचा हक्क आहे' अशा अर्थाची आत्यंतिक पण अर्थपूर्ण अशी व्याख्या करीत. या दोन्ही व्याख्यांत सुराज्यापेक्षां स्वराज्यावर हेतुपूर्वक भर दिलेला आहे. तथापि, आम्हांला स्वराज्य हवें तें पारतंत्र्याचा जगजाहीर काळिमा पुसण्याकरतांच केवळ हवें असें नाहीं. सुराज्याच्या आणि स्वतंत्र राष्ट्राच्या कांहीं स्पष्ट कल्पना आम्हांला आहेत; आणि त्या प्रत्यक्षांत आणण्याला पारतंत्र्याचा मोठा अडथळा होत आहे, म्हणून आम्हांला राजकीय स्वातंत्र्य हवें अशी केतकरांची मांडणी असे. ते म्हणतात : "नागरिकांचा फायदा ही राज्यपद्धतीच्या चांगुलपणाची खरी कसोटी आहे. राज्यपद्धति कोणतीहि असो, ती लोकसत्ताक असो अगर एकसत्ताक असो, राज्यव्यवस्था नेहमीं अगदीं थोडक्यांच्या हातांत असते ही गोष्ट विसरतां कामा नये. देशाचा व्यापार मंदावला, पोलीस खातें बिघडलें व कर्तव्यपराङ्मुख झालें, सुरक्षितता कमी झाली, पैसेवाले सावकार देश सोडून अन्यत्र वस्ती करावयास जाऊं लागले, आणि देशांतल्या रोगांशीं सरकारास झगडतां न आल्यामुळें हजारों माणसें मृत्युमुखीं पडलीं...... लष्कराचे पगार थकले, सरकारला थोडक्या व्याजानें कर्ज मिळेनासें झालें आणि अधिकार मात्र काळ्या चामडीच्या लोकांच्या हातीं राहिला, म्हणजे तो देश स्पृहणीय स्थितींत आहे असें कोण म्हणेल ? आणि स्वराज्याचें समर्थन तरी कसें होईल ?—"

आजच्या जगांत आपण अत्यंत मागसलेले आहोंत याची जाणीव त्यास प्रागतिक पक्षाइतकीच तीव्र होती. तथापि, "इतके आपण मागसलेले आहों आणि आपणांस स्वराज्य मिळालें नाहीं तर आपण तसे मागसलेले कायमचें राहूं" असेंहि ते बजावीत. स्वराज्य हा केवळ स्वजनांच्या राजकीय अब्रूचाहि प्रश्न नव्हे, कीं बिलंदर परकीयांपासून आपला देश संभाळण्याचाहि प्रश्न नव्हे; तर देशाच्या अनेकविध प्रगतीचा मार्ग खुला करून पुढारलेल्या राष्ट्रांच्या दर्जाला येऊन पोहोंचण्याचा प्रश्न आहे असें ते समजत व म्हणूनच इतर देशांचा—ब्रिटनचाहि—या गोष्टीला विरोध असण्याचें कारण नाहीं असें ते प्रतिपादीत.

डॉ. केतकर कधीं कधीं महात्मा गांधींवर भयंकर वैयक्तिक वाटण्यासारखीहि टीका करीत; पण जुन्या राष्ट्रीय पक्षाला न पटण्यासारख्या अनेक बाबतींत त्यांच्या व गांधींच्या मतांत सादृश्य होतें ही गोष्ट मौजेची आहे. हिंदुस्थानला स्वराज्य देण्यांत ब्रिटनचा विरोध असण्याचें कारण नाहीं हें त्यांचें मत अशांपैकींच एक होय. पण त्या म्हणण्याचें समर्थन करतांना केतकरांनीं दिलेलीं कारणें मात्र कांहींशीं राष्ट्रविरोधापेक्षां वर्गविरोधावर भर देऊन राजकीय मीमांसा करणाऱ्या मार्क्सिस्टांसारखीं आहेत.

## एका वर्गाच्या हिताकरितां वित्तचौर्य

जेत्यांच्या राज्य करण्याच्या पद्धतींत कसकसा फरक होत गेला हे त्यांनीं इंग्लंडमधील नॉर्मन् सरदारांच्या इतिहासावरून आणि जावामधील डच राजकर्त्यांच्या जमिनदारीच्या इतिहासावरून दाखवून दिलें आहे. न्यायदान अगर वसूल या कामांतील वांटा उचलणारे मोठमोठे जहागीरदार जुन्या





अनुक्रमणिका

जमान्यांत अवश्य असले, तरी आधुनिक काळांतील राज्यकर्ते स्वतःचे अधिकारी नेमूनच सर्व कारभार पाहूं लागले. जित प्रजेला लुटण्याची इच्छा नष्ट झाली असे नव्हे, तर लुटण्याच्या पद्धतींत बदल झाला. लॉर्ड सॅलिसबरीनें हिंदुस्थानचें रक्तशोषण करण्याची राजनीति जाहीर केली. तसेंच हिंदुस्थानांतील कापडाचा धंदा बसविण्याकरतां हिंदुस्थानांतील सत्तेचाच उपयोग करण्यांत आला. पहिल्या युद्धानंतर जर्मन रंगांच्या आपत्तीबाबतहि इंग्लंडला फायदेशीर असें नियंत्रण हिंदुस्थान सरकारनेंच घातलें. या सर्व गोष्टी खऱ्या आहेत. तथापि, हिंदुस्थानची ही राष्ट्रीय लूट इंग्लंडच्या दृष्टीनें राष्ट्रीय फायद्याची नसून विशिष्ट वर्गाच्याच फायद्याची होती. केतकर म्हणतात : 'जेतृपदाचें हित जितवर्गाला लुटण्यानें साधत नाहीं.' 'हिंदुस्थानचें पालकत्व कांहीं विशिष्ट वर्गास स्वतःस किफायतवार करून घ्यावयाचें आहे; त्यासाठीं तो इंग्लंडच्या हिताच्या गोष्टी बोलत आहे एवढेंच.' इंग्लंडमधील एका वर्गाच्या हिताकरितां हिंदुस्थानचें वित्तचौर्य होत आहे व त्यामुळें हिंदुस्थान इंग्लंडचा शत्रु होत आहे हें कळलें, म्हणजे ही वित्तचौर्या-( exploitation )ची प्रवृत्ति कमी होईल असें केतकरांचें प्रतिपादन असें.

एका राष्ट्राचा दुसऱ्या राष्ट्रावर मालकीसंबंध उत्पन्न होणें हें दोन्ही पक्षीं हितावह नाहीं, हें तत्त्व जगांत बोल्शेविकांनीं प्रथम जाहीरपणें मान्य केलें; या गोष्टीचें केतकरांनीं अभिनंदन केलें आहे. त्यांच्या शासनपद्धतीची घटना केतकरांनीं ज्ञानकोशाच्या पहिल्या विभागांत अन्तर्भूतहि केली होती; व एक प्रकारें जिला ते 'शूद्रसत्ता' म्हणून हिणवीत त्या बोल्शेव्हिक् सत्तेच्या राजकीय धैर्याचा त्यांनीं तेवढ्यापुरता गौरवहि केला होता. तथापि, "राष्ट्रसंघाची सत्ता जर पुढेंमागें बळावत गेली तर मात्र साम्राज्य आणि साम्राज्यान्तर्गत घटक यांचे संबंध, आहेत त्यापेक्षांहि, अधिक स्वयंनिर्णयपर होतील" अशी केतकरांची श्रद्धा होती.

## 'स्वराज्योत्तर कर्मपरंपरेची कल्पना'

पण त्याहूनहि विशेष म्हणजे इंग्लंड आणि हिंदुस्थान यांच्या व्यापारक्षेत्रीय हितविरुद्धत्वाची कल्पना कशी भ्रामक आहे हें त्यांनीं आंकडेवारीनें सिद्ध केलें आहे. केतकरांचें मत असें होतें कीं, औद्योगिक दृष्ट्या विकसित अशा दोन देशांचा व्यापार कमी न होतां उलट वाढत जातो. हिंदुस्थानांत पक्का माल अधिक होऊं लागल्यास हिंदुस्थानला इंग्लिश मालाची गरज राहणार नाहीं, ही गोष्ट केतकरांना मान्य नव्हती. त्यांनीं इंग्लंड आणि फ्रान्स यांच्या आयात-निर्यातींचे आंकडे देऊन आपलें म्हणणें सिद्ध केलें आहे. दोन कारखानदार-देशांतील पक्क्या मालाचा व्यापार कमी होत नाहीं; तर उत्पादनांत व व्यापारांत 'विशिष्टीकरण' होतें, असें त्यांनीं दाखवून दिलें आहे. हिंदुस्थान व इंग्लंड यांच्या व्यापारविकासांत सहकारिता राहणें शक्य आहे, इतकेंच नव्हे तर तें हिंदुस्थानच्या हिताचें आहे असें त्यांचें मत होतें. शेवटीं ते म्हणतात : "अर्थात् भारतीयांचा स्वराज्यार्थ प्रयत्न, हा साम्राज्याचा व्यवहार आजच्यापेक्षां उच्च व निर्मळ तत्त्वावर चालविण्यासाठीं व साम्राज्यसंस्था अधिक यशस्वी तऱ्हेनें चालविण्यासाठीं आहे. अर्थात् या चळवळीस अज्ञानाखेरीज कोणीहि दुसरा शत्रु नाहीं हें समजून आपलें स्वराज्य-स्थापनेचें कार्य आपण निर्भयपणें करीत असलें पाहिजे."

पण केतकरांचें आणखी एक मत तर जुन्या राष्ट्रीय पक्षाला याहूनहि विचित्र वाटलें असतें. स्वराज्यप्राप्तीनंतर इंग्रज नोकरांची एकदम हकालपट्टी करण्याचें कारण नाहीं असें त्यांचें मत होतें. "इंग्रजांच्या नोकरीचा प्रश्न देशहितावर अवलंबून ठेवला तर बऱ्याच इंग्रज लोकांच्या नोकऱ्या एकदम जातील किंवा त्यांचें नुकसान होईलसें वाटत नाहीं." केतकरांचें हें मत बरोबर कीं चूक हा प्रश्न वेगळा; तथापि, त्यांच्या या मतावरून ते अनेक टिळकपक्षीयांपेक्षां अगर गांधीवाद्यांपेक्षां मवाळ व इंग्रजधार्जिणे होते, असें ज्यास वाटेल त्यांनीं, केतकरांचा दृष्टिकोनच भिन्न होता हें लक्षांत घेतलें पाहिजे. ते म्हणतात : "स्वराज्य हें कांहीं अत्यंत श्रेष्ठ सामाजिक हेतूंच्या साधनेसाठीं आहे ही गोष्ट पूर्णपणें न पटतां स्वराज्याची चळवळ इंग्रजांस दूर करण्यासाठीं आहे अशीच बऱ्याच लोकांची समजूत आहे." "स्वराज्याची चळवळ सामाजिक








ध्येयमूलक नसून केवळ सुशिक्षित महत्त्वाकांक्षामूलक आहे." "आज अत्यंत सुशिक्षित राजकारणी वर्गासहि स्वराज्योत्तर कर्मपरंपरेची कल्पना नाहीं." "बोल्शेव्हिकांची विचारमाला अगोदर जन्माला आली आणि राज्याधिकार त्यांस मागाहून मिळाले. त्यामुळें त्यांची कर्तव्यपरंपरा पूर्वींच निश्चित झाली असून तिला व्यावहारिक स्वरूप देण्याचा प्रश्न त्यांच्यापुढें होता."

वरील कित्येक मतांत, केतकर जुन्या राष्ट्रीय पक्षाहून भिन्न असले, तरी लष्करीकरणाच्या बाबतींत ते टिळक आणि सावरकर यांना अत्यंत जवळचे होते. १९२६ सालच्या लिखाणांतहि ते या गोष्टीवर भर देतात. इंग्रज डोमिनियन् स्टेटस् देणार हें निश्चित; तर देशरक्षणाची जबाबदारी पत्करण्यापूर्वी लष्करी अधिकाऱ्यांचा वर्ग तयार हवा. गेल्या महायुद्धांत तयार झालेले अनेक हिंदी सेनापती आणि अधिकारी आपणांजवळ नसते, तर १९४७ साली (देशांतच भिन्न राष्ट्र उत्पन्न झाल्यावर) स्वातंत्र्य आणि त्याबरोबरच संरक्षणाची जबाबदारी पत्करतांना गांधी-नेहरूंसारख्या बहादर पुढाऱ्यांनाहि जडच वाटलें असतें असें मला वाटतें. या दृष्टीनें पाहतां, गांधी-नेहरूंनीं दुसऱ्या महायुद्धांत सैनिकीकरणावर भर दिला नाहीं पण अखेर परिस्थितीनें घडवून आणलेल्या सैनिकीकरणाचाच फायदा झाला!

### खादीच्या आग्रहामागील इंगित

केतकरांना गांधींच्या चळवळींतील अनत्याचारित्वाचें महत्त्व मान्य होतें इतकेंच नव्हे, तर खादीचेंहि खोल व सत्य रहस्य अवगत होतें. एवढ्या प्रचंड देशांतील, प्रत्येक प्रांतांतील प्रत्येक माणसानें सूत काढणें केतकरांना अव्यवहार्य वाटे. हा अव्यवहार्य मार्ग गांधी स्वतः कापसाच्या प्रांतांतील असल्यामुळें त्यांनीं सांगितला असें केतकर म्हणत! तरी खादीच्या आग्रहाचें राष्ट्रीय इंगित वेगळेंच आहे हें त्यांनीं ओळखलें होतें. ते म्हणतात : "...तथापि या चळवळीमागें जें तत्त्व होतें तें उपेक्षिण्याजोगें नाहीं. उलट तें तत्त्व भावी राजकारणांतील महत्त्वाचा भाग आहे असें मी समजतों. सर्व राजकारण आर्थिक उन्नतीसाठीं आहे...... देशांत उद्योग वाढविणें म्हणजे मनुष्याचे निरुद्योगाचे दिवस कमी करणें ही मोठी महत्त्वाची गोष्ट आहे.......या सर्व गोष्टींचें महत्त्व इतकें आहे कीं स्वराज्य म्हणजे हेंच आहे; एवढेंच नव्हे तर स्वराज्य हें केवळ राष्ट्राला वर्षभर उद्योगाला लावणाऱ्या कार्यक्रमाचें साधन आहे; हीं सर्व अमर्त्य तत्त्वें महात्माजींच्या खादीच्या आग्रहाच्या मुळाशीं आहेत. आणि याविषयीं मी असें सांगतों कीं या तत्त्वांचें भावी राजकारणांत इतकें महत्त्व आहे कीं त्या तत्त्वांसाठीं महात्मा गांधींसारख्यांचें आयुष्य खर्ची पडलें तरी त्यांनीं स्वराज्य संपादण्याइतकीच महत्त्वाची कामगिरी केली असें मी समजेन."

### 'निःशस्त्रांचें राजकारण'

केतकर गांधींना शेलक्या शिव्या देत हें प्रसिद्ध आहे; पण त्यांना गांधींच्या अनत्याचारित्वाचें आणि खादी-प्रचाराचें महत्त्व मनापासून वाटत होतें हें तितकेसें प्रसिद्ध नाहीं. किंबहुना आधुनिक भारतांतील व महाराष्ट्रांतील सर्वच राजकीय पक्षांकडे केतकर गुणग्राहकतेच्या भावनेनें पाहात होते असें दिसून येईल. तथापि १९३५ च्या कायद्यानें आपणांस पूर्ण स्वराज्य मिळालें आहे असें म्हणून ते प्रायः सर्वच राजकीय पक्षांना व विशेषतः गांधीवादी काँग्रेसला वेड्यांत कां काढीत याची मीमांसा करणें मनोरंजक होईल. राजकीय विचारांतील त्यांच्या या अन्तिम अवस्थेंत थोडाफार वैयक्तिक अतिरेक होता, असें मला देखील वाटतें. तथापि राज्यघटनाशास्त्र व हिंदी राजकारण यांच्यासंबंधीं त्यांचे कित्येक स्वतंत्र सिद्धान्त हेच त्या अवस्थेच्या मुळाशीं होते. तथापि १९३५ च्या कायद्यासंबंधीची त्यांची लोकविलक्षण भूमिका स्वतंत्रपणेंच चर्चिली पाहिजे.





अनुक्रमणिका

प्रा. नलिनी पंडित

# नव मानवतावाद

## राष्ट्रवादाचीं स्थित्यंतरें

स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंत तरी राष्ट्रवाद हाच हिंदुस्थानांतील राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक जीवनाचा मध्यबिंदु होता. या राष्ट्रवादाची कल्पना जरी आधुनिक सुशिक्षितांनीं युरोपीय इतिहासापासून उचलली असली, तरी तिच्या प्रचारासाठीं त्यांनीं भारताच्या मध्ययुगीन इतिहासाचाच सर्रास उपयोग केला. जोंपर्यंत आपल्या राजकीय चळवळीचें स्वरूप लोकजागृति, मतप्रदर्शन, मागण्या व निषेध एवढ्यापुरतें मर्यादित होतें, तोंपर्यंत आपला राष्ट्रवाद बहुंशीं पुनरुज्जीवनवादीच होता. १९२० मध्यें परकीय सत्तेशीं प्रत्यक्ष लढा देण्याची जेव्हां वेळ आली, तेव्हां उत्तरोत्तर राजकीय कार्यकर्त्यांच्या विचारप्रणालींत बहुजनसमाजाच्या आकांक्षांना अधिकाधिक वाव मिळूं लागला. त्यामुळें राष्ट्रवादांतील पुनरुज्जीवनाची प्रवृत्ति हळूहळू मागें पडत चालली. शिवाय पहिल्या महायुद्धाच्या काळांत आंतरराष्ट्रीय स्पर्धा कमी झाल्यामुळें हिंदी उद्योगधंद्यांना प्रथमच थोडी चालना मिळाली. उद्योगधंद्यांच्या वाढीबरोबर जुन्या सामाजिक बंधनांविरुद्ध व्यक्तिस्वातंत्र्याचा पुरस्कार होणें स्वाभाविक होतें. त्याबरोबरच स्वातंत्र्याची-चळवळ प्रभावी होण्याच्या दृष्टीनें एकांतिक व्यक्तिवादाला मुरड घालणेंहि आवश्यक होतें. शिवाय महायुद्धाच्या भीषण परिणामामुळें खुद्द युरोपांतहि व्यक्तिवादाचा पाया ढांसळत चालला होता; आणि त्याचा आधार घेऊन सनातनी लोक येथेंहि व्यक्तिस्वातंत्र्याला विरोध करीत होते. अशा परिस्थितींत राष्ट्रवादाला गांधीजींच्या अध्यात्मनिष्ठ मानवतावादाची जोड मिळाली. त्यांनीं आपल्या सत्याग्रही तत्त्वज्ञानांत व्यक्तीच्या अंतःप्रेरणेला अग्रस्थान दिलें; परंतु अहिंसा, त्याग, सेवा, सहकार्य इत्यादि गुणांवर सतत भर देऊन व्यक्तिस्वार्थाला पायबंद घातला. जातीय ऐक्य, अस्पृश्यतानिवारण, दलितोद्धार यांसारख्या सामाजिक प्रश्नांचा पाठपुरावा करून त्यांनीं राष्ट्रवादांतील संकुचितपणा नाहींसा केला आणि हृदयपरिवर्तनाचें महत्त्व प्रतिपादून सुधारणावादांतील तीक्ष्णता व कटुता पुष्कळच कमी केली. अशा रीतीनें महात्माजींनीं टिळकयुगांतील राष्ट्रवादी व सुधारणावादी या दोन परस्परविरोधी प्रवृत्तींचा समन्वय साधला. त्यामुळें बरींच वर्षें अध्यात्मनिष्ठ सत्याग्रही सुधारणावाद हेंच हिंदी समाजजीवनांतील प्रमुख तत्त्वज्ञान होऊन बसलें.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर ही परिस्थिति बदलली. वरिष्ठ वर्गाच्या हातांत सत्ता आल्यावर गांधीजींच्या मानवतावादाची त्यांना अडचण वाटूं लागली. औद्योगिक विकासाची संधि प्राप्त होतांच राष्ट्रीय आपत्तीच्या नांवावर शेतकरी-कामकऱ्यांच्या न्याय्य मागण्याहि धुडकावल्या जाऊं लागल्या. वास्तववादाच्या आवरणाखालीं ध्येयनिष्ठेची अशी गळचेपी होऊं लागल्यामुळें डावे गट राष्ट्रसभेंतून बाहेर पडले. जुन्या सर्वसंग्राहक राष्ट्रवादांत सामावले गेलेले विचारप्रवाह आतां स्वतंत्रपणें वाहूं लागले. राष्ट्रसभेशीं अजूनहि एकनिष्ठ राहिलेले गांधीवादी कार्यकर्ते विधायक कार्यांतच गढून गेल्यामुळें सामाजिक संघर्षापासून दूर राहात आहेत. जनतेचे प्रश्न सोडविण्याची त्यांना खरी तळमळ असूनहि ते आपल्या कल्पनांना मूर्त स्वरूप देऊं शकत नाहींत. उलट परकीय सत्तेचें दडपण नाहींसें झाल्यानें वर्गकलहाची तीव्रता मात्र जाणवूं लागली; आणि कामगार वर्गांतील वाढत्या असं-










अनुक्रमणिका

तोषामुळें समाजवादी प्रवृत्ती बळावत चालल्या. वर्गविग्रहाच्या या संक्रमणकालांत मध्यमवर्गाची स्थिति मात्र फारच करुणास्पद बनली आहे. त्यांतील बहुसंख्य लोक वर्गविग्रहाची वस्तुस्थिति दृष्टिआड करून लोकशाहीच्या तत्त्वांशीं विसंगत असणाऱ्या धर्मनिष्ठ राष्ट्रवादाची व एकचालकानुवर्तित्वाची तरफदारी करतात. परंतु याच वर्गांतील कांहीं सुशिक्षित लोक उदारमतवादी संस्कारांत वाढलेले आहेत. लोकशाहींतील मूल्यांवर त्यांची श्रद्धा असली, तरी भांडवलदारी अर्थव्यवस्थेवर आधारलेल्या युरोपीय लोकशाहीच्या उणीवा त्यांना कळून चुकल्या आहेत. त्याबरोबरच किसान-कामगारांचें संघटित सामर्थ्य व्यक्तिस्वातंत्र्याला मारक ठरेल असें त्यांना भय वाटत असल्यानें नव्या समाजवादी प्रवृत्तींचें उत्साहानें स्वागत करण्याची त्यांची तयारी नाहीं. म्हणून मानवतावादाच्या जुन्या समन्वयशील तत्त्वज्ञानालाच बुद्धिवादी पायावर उभे करण्याचा त्यांनीं प्रयत्न चालविला आहे. रॉयप्रणीत नवमानवतावाद हा त्या प्रयत्नांचाच एक परिपाक होय.

## मानवतावाद कीं व्यक्तिवाद ?

आदर्श समाजाची स्थापना स्वातंत्र्य, समता व बंधुभाव या तत्त्वांवर व्हावी आणि व्यक्तिविकास हाच सामाजिक प्रगतीचा मानदंड समजला जावा इत्यादि मानवतावादांतील मूलभूत सिद्धान्त कोणालाहि अमान्य होण्याचें कारण नाहीं. परंतु अशा सर्वमान्य सिद्धांतांच्या केवळ तात्त्विक विवेचनानें सद्यःस्थितींतील सामाजिक समस्या सोडविण्यास कांहींच मदत होणार नाहीं. कारण आज व्यक्ति कुठेंहि पूर्णपणें स्वतंत्र नाहीं. आर्थिक व सांस्कृतिक बंधनांत शतकानुशतकें गुंतून पडलेल्या असंख्य व्यक्तींना कोणत्या मार्गानें स्वतंत्र करावयाचें, हाच जगांतील समाजधुरीणांपुढील निकडीचा प्रश्न आहे. विषमतेवर आधारलेल्या समाजांत निरनिराळ्या वर्गांतील व्यक्तींचे हितसंबंध नुसते भिन्नच नव्हे, तर बहुशः विरोधीच असतात. त्यामुळें अशा भिन्नवर्गीय व्यक्तींत कोणताच वास्तविक दुवा नसतो. तेव्हां बाह्य परिस्थितीनें एकमेकांपासून दूर ढकललेल्या मानवांना पुन्हां एकत्र आणण्यासाठीं ती परिस्थिति न बदलतांच 'मानव तितुका एकच जगतीं ' अशा जे घोषणा करतात त्यांना वेगवेगळ्या व्यक्तींना जवळ आणणारी शक्ति स्वतःच्या कल्पनेंतूनच निर्माण करावी लागते. मध्ययुगीन मानवतावादी अशा वेळीं लोकांच्या ईश्वरविषयक श्रद्धेला आवाहन करीत. एकाच परमेश्वराचे आपण उपासक आहोंत, एकाच जगन्मातेचीं आपण लेंकरें आहोंत, एकाच चित्सागराच्या आपण लहरी आहोंत अशा भावनेनें जुन्या साधुसंतांनीं जगाला समतेचे व बंधुभावाचे पाठ दिले. पुढें भौतिक शास्त्रांचा उदय झाल्यावर जगच्चालक परमात्म्याच्या आस्तित्वावरील लोकांचा विश्वासच उडत चालला. तेव्हां अठराव्या शतकांत परमेश्वराची जागा मानवी अंतःप्रेरणेनें घेतली. निसर्गाच्या नियमाप्रमाणें सामाजिक जीवनकलहांतहि जो समर्थ असेल तोच टिकून राहण्यास योग्य आहे, एवढेंच नव्हे तर या अनिर्बंध स्पर्धेमधून वावरणारी अव्यक्त नियामक शक्ति व्यक्तिस्वार्थाच्या प्रेरणेमधूनहि समाजहिताची जोपासना करील असें तत्कालीन विचारवंतांचें ठाम मत होतें. म्हणून त्यांनीं सर्व क्षेत्रांत अनिर्बंध स्पर्धेचा निःशकंपणें पुरस्कार केला. परंतु एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत आर्थिक जीवनांत मक्तेदाऱ्या ( monopolies ) निर्माण झाल्यावर या 'स्पर्धावादी ' तत्त्वज्ञानाचा अपुरेपणा त्याच्या पुरस्कर्त्यांनाहि जाणवूं लागला. वास्तविक पाहतां स्पर्धायुगांतील अस्थिरपणांतूनच मक्तेदारीची ही प्रवृत्ति जन्मास आली होती. परंतु तिच्या वाढीबरोबर व्यक्तिवाद्यांचा जुना आधार तुटला; म्हणून मग त्यांनीं शासनसंस्थेकडे धांव घेतली. वर्गलढ्याची सत्यता नाकबूल करणें आतां त्यांना शक्यच नव्हतें, पण शासनसंस्था सामाजिक संघर्षापासून अलिप्त असल्यामुळें ती मध्यस्थाचें काम करून, अंतर्विरोधाची तीव्रता कमी करील अशी त्यांना आशा होती. राज्यसंस्थेला महत्त्व देणाऱ्या या प्रवृत्तीची अखेर फॅसिस्टांच्या तत्त्वज्ञानांत परिणति झाली. आजचे ब्रिटिश व अमेरिकन व्यक्तिवादीहि अनिर्बंध स्पर्धेचें पुनरुज्जीवन करण्यासाठीं शासनसंस्थेवरच अवलंबून आहेत. पण फॅसिझम् आज तत्त्वतः पराभूत झाला आहे. हुकूमशाही राष्ट्रांतील व्यक्तिजीवनाची वाताहत सर्वांच्या डोळ्यांसमोर आहे. त्यामुळें व्यक्तिव्यक्तींना सांधणारी नवी शक्ति शोधून काढण्यासाठीं व्यक्तिवाद्यांना पुन्हां एकदां आपल्या कल्पनाशक्तीला

ताण देणें भाग पडलें. यासाठींच नवमानवतावाद्यांनीं मानवी बुद्धीचा आश्रय घेतला आहे. बुद्धिमत्ता हें मानवतेचें खास वैशिष्ट्य आहे, तेव्हां या मानवी बुद्धीला आवाहन करून समाजकारणांतील सर्व झगडे मिटवितां येतील व मनुष्यमात्राला प्रेमाचें, सुखाचें व शांततेचें जीवन जगतां येईल अशी त्यांची अपेक्षा आहे.

## बुद्धिनिष्ठ गूढवाद

मानवी बुद्धीची एखाद्या दैवताप्रमाणें उपासना करणाऱ्या या विचारसंप्रदायाला गूढवादी म्हटल्यास कांहीं वावगें होणार नाहीं; कारण इंग्रज इतिहाससंशोधक टॅानें यांनीं म्हटल्याप्रमाणें " गूढवाद हा केवळ भावनेवरच अधिष्ठित असतो असें नाहीं; तर बुद्धीवरहि त्याची उभारणी होऊं शकते. अठराव्या शतकांतील विचारवंतांनीं सामाजिक जीवनांतून परमेश्वराला हद्दपार करून त्याच्या सिंहासनावर नैसर्गिक प्रेरणांची स्थापना केली; इतकेंच नव्हे तर परमेश्वराप्रमाणें त्यांच्या अचिंत्य व अनिर्वचनीय स्वरूपाची ग्वाही देण्यास ते मुळींच कचरले नाहींत."[१] आजच्या मानवतावादी तत्त्वज्ञानालाहि हें विधान तंतोतंत लागूं पडतें. मात्र व्यक्तीच्या स्वार्थमूलक सहजप्रवृत्तीवर जुन्या युरोपीय विचारवंतांनीं आपलें तत्त्वज्ञान आधारलें, तर वर्गवर्चस्वाचें हिडीस स्वरूप दृष्टीस पडल्यामुळें नव्या मानवतावाद्यांनीं स्वार्थाऐवजीं मानवाची बुद्धि व नैतिक प्रेरणा यांची कांस धरली. तसें पाहिलें तर मानवी बुद्धीची अध्यात्मनिष्ठ कल्पना रॉयप्रभृति विचारवंतांनाहि तत्त्वतः मान्य नाहीं. माणसाच्या अंतःप्रवृत्तीची भौतिक दृष्टीनेंच मीमांसा व्हावयास हवी, तिच्यांत यत्किंचितहि गूढता असतां कामा नये असें त्यांनीं जागोजाग म्हटलें आहे. परंतु सामाजिक जीवनाला बुद्धिवादाचें अधिष्ठान देऊन राजकारण व नीति यांची बेमालूम सांगड घातली पाहिजे असें प्रतिपादतांना त्यांनीं जें बुद्धीचें स्वरूप आणि प्रभाव वर्णिला आहे त्यांत वस्तुनिष्ठ दृष्टीपेक्षां गूढवादाचाच भाग अधिक आहे. मनुष्य हा बुद्धियुक्त प्राणी आहे याबद्दल मुळींच वाद नाहीं. परंतु बुद्धिमत्ता व बुद्धिवाद यांतील फरक दुर्लक्षिल्यामुळें नवमानवतावाद्यांच्या विचारांत गोंधळ उत्पन्न झाला आहे. वास्तविक पाहतां बुद्धि ही एक निसर्गदत्त देणगी आहे, तर बुद्धिवाद हें ऐतिहासिक प्रगतीच्या प्रवाहांत उगम पावलेलें एक स्वतंत्र सामाजिक तत्त्वज्ञान आहे. लोकव्यवहाराची बारकाईनें पाहणी केल्यास प्रत्येक बुद्धिमान् मनुष्य बुद्धिवादी असतोच असें आढळणार नाहीं. बुद्धीहि स्खलनशीलच आहे. तिच्या डोळसपणाला देशकालपरिस्थितीच्या मर्यादा पडल्याखेरीज रहात नाहींत. तेव्हां शुद्ध बुद्धीचे निर्णयहि प्रत्यक्ष कृतीच्या कसोटीवर वारंवार घासून पाहिले, तरच ते प्रगतीला पोषक होतात. शिवाय विवेकबुद्धीला जें पटेल तेंच आचरणांत आणण्याऐवजीं सहजगत्या आपल्या हातून घडणाऱ्या गोष्टींच्या समर्थनासाठींहि पुष्कळदां बुद्धीचा वापर होतो. 'अन्यच्छ्रेयोऽन्यदुतैव प्रेयः' हें ध्यानांत न घेतां, जें सहज तेंच न्याय्य, जें प्रिय तेंच श्रेयस्कर असें मानण्याकडे सर्वसामान्य माणसांचा कल असतो. म्हणूनच बुद्धिवादाचें तत्त्वज्ञान निर्माण होऊन बराच काळ लोटला तरी त्याला विरोध करणारे अनेक विचारवंत अजूनहि दृष्टीस पडतात. अठराव्या शतकांतील कित्येक युरोपीय लेखकांनीं या तत्त्वज्ञानाचा हिरीरीनें प्रचार केला. तरीहि पुढें जर्मनी व जपान यांसारख्या सुधारलेल्या देशांनींहि श्रद्धावादाचाच स्वीकार केला.

---

१ "There is a mysticism of reason as well as of emotion, and the eighteenth century found in the beneficence of natural instincts a substitute for the God whom it had expelled from contact with society, and did not hesitate to identify them.

Thus God and nature planned the general frame,
And bade self-love and social be the same"

—R. H. Tawney;
'The Acquisitive Society.' p. 15.





अनुक्रमणिका

बुद्धिवादाच्या या अपयशाचें कारण त्या त्या देशांच्या भौतिक परिस्थितींत सांपडतें. कोणत्याहि विचारसरणीची केवळ तर्कशुद्ध मांडणी करून कांहीं तिचा प्रभाव पडत नाहीं. त्यासाठीं इतर अनेक गोष्टी विचारांत घ्याव्या लागतात. म्हणून ध्येयवादाचा ज्यांनीं वस्तुस्थितीशीं मेळ घातला नाहीं, बुद्धिवादाला भौतिक जीवनाची साथ मिळविण्याची ज्यांनीं दक्षता घेतली नाहीं, ते सामाजिक झगड्यांत वेळोवेळीं अयशस्वी होत आले आहेत. प्रतिगामी व्यवहार-पंडितांनीं अशा स्वप्नाळु ध्येयनिष्ठांवर नेहमींच मात केली आहे.

बुद्धिवाद हें सामान्यतः उगवत्या वर्गानें प्रस्थापित हितसंबंधांवर हल्ला चढविण्यासाठीं वापरलेलें एक शस्त्र आहे. ऐतिहासिक क्रमानें जेव्हां नवा वर्ग उदयास येतो, तेव्हां प्रचलित समाजरचनेमुळें त्याच्या विकासांत खूपच अडथळे येतात. सत्ताधारी वर्ग रूढि व परंपरा यांच्या जोरावर त्यांच्या आकांक्षा दडपून टाकण्याचा प्रयत्न करतो. अशा वेळीं जुन्या विचारप्रणालीवर निष्ठुरपणें प्रहार करण्यास बुद्धिवाद उपयोगी पडतो. मग साहजिकच सनातन रूढि व परंपरागत संकेत यांच्याविरुद्ध मानवी प्रेरणेचें व बुद्धीचें महत्त्व गाइलें जातें. हा सामना ज्या ठिकाणीं अटीतटीचा असतो, त्या ठिकाणींच बहुधा बुद्धिवाद विजयी होतो अशी इतिहासाची साक्ष आहे. सतराव्या शतकांत इंग्लंड व अठराव्या शतकांत फ्रान्स या देशांत जुन्या-नव्या प्रवृत्तींचा तीव्रतर संघर्ष असल्यानें तेथील आक्रमणशील मध्यमवर्गानें बुद्धिवादाचें तत्त्वज्ञान पत्करलें. विशेषतः फ्रेंच राज्यक्रांतीच्या नेत्यांवर या विचारसरणीचा त्वरित पगडा बसला. उलट, जर्मनी व जपान या देशांतील सत्ताधारी वर्गानें इतर देशांच्या अनुभवानें शहाणपणा शिकून व्यापारीवर्गाशीं सलोखा राखला. त्यामुळें या राष्ट्रांत प्रखर बुद्धिवाद कधींच रुजला नाहीं. हिंदुस्थानांत तर औद्योगिक विकासाला वावच नव्हता. जमीनदार, शेतकरी, मालक आणि मजूर या सर्वांचीच परकीयांकडून कमजास्त पिळणूक होत असल्यामुळें प्रतिकाराच्या भावनेनें सर्व वर्ग एक झाले. सगळ्यांनाच या काळांत एकोप्याची व सहकार्याची गरज वाटली. त्यामुळें येथील सुधारकांनीं सनातन्यांशीं, भांडवलदारांनीं सरंजामदारांशीं आणि श्रमिकांनीं धनिकांशीं तडजोडीचें धोरण ठेवून झगडा टाळला. म्हणून टिळक-गांधींसारख्या सिद्धप्रज्ञ नेत्यांच्या विचारांतहि बुद्धिवादाला कधीं थारा मिळाला नाहीं. या सर्व विवेचनाचा इत्यर्थ इतकाच कीं जुनी समाजरचना खिळखिळी करून टाकण्यासाठीं बुद्धिवादाचें हत्यार उपसणारा वर्ग जागृत असल्याखेरीज ती तत्त्वप्रणाली सफळ होत नाहीं. म्हणून उगवत्या वर्गाच्या आकांक्षांची दखलहि न घेतां समाजांत बुद्धिवादाचा प्रसार करतां येईल ही आशा व्यर्थच होय.

/ बुद्धिवादाइतकेंच मानवतावाद्यांच्या विचारसरणींत नीतिमूल्यांनाहि महत्त्वाचें स्थान आहे. परंतु त्यांची नीतीची कल्पना वस्तुनिष्ठ व परिस्थितिसापेक्ष आहे असें दिसत नाहीं. बुद्धिनिष्ठ नीतिशास्त्रा-(rationalist ethics) चा ते पुरस्कार करतात परंतु त्यांच्या साधन-चिकित्सेंत शाश्वत मूल्यांचाच आग्रह आढळतो. कालाच्या प्रवाहाची दिशा न ओळखतां त्रिकालाबाधित नैतिक मूल्यांच्या या प्रचारामुळें जुन्या सामाजिक बंधनांची पकड ढिली होण्याऐवजीं ती अधिकच दृढ तर होणार नाहीं ना, अशी भीति वाटते. कोणतीहि पुरोगामी चळवळ यशस्वी होण्यासाठीं लोकांच्या नैतिक प्रेरणेला आवाहन करावें लागतेंच; परंतु ही प्रेरणा रूढ व सांकेतिक नीतिनियमांशीं सुसंवादी असण्याचा फारसा संभव नाहीं. तसेंच प्रचलित समाज-व्यवस्थेचें नैतिक अधिष्ठान नष्ट केल्याबरोबर ती लगोलग कोसळून पडत नाहीं. तर नव्या तत्त्वज्ञानावर व नीतिमूल्यांवर आधारलेल्या सुसंघटित प्रतिकाराच्या द्वारेंच तिचें निर्मूलन करावें लागतें./

## बुद्धिवाद आणि मध्यमवर्ग

नवमानवतावाद्यांना मात्र वास्तववादाचें व वर्गसंघटनेचें वावडेंच दिसतें. त्यांचे लेख वाचले, त्यांचीं भाषणें ऐकलीं म्हणजे कोणत्या तरी विरल कल्पनामय वातावरणांत ते वावरत असावेत असा भास होतो. /म्हणूनच समाजांतील निरनिराळ्या घटकांच्या बलाबलाचा विचारहि न करतां मध्यमवर्गाच्या सामर्थ्यावर त्यांनीं आपल्या आशेचा





अनुक्रमणिका

डोलारा उभारला आहे. नवसमाजनिर्मितीचें कार्य मध्ययुगाच्या अखेरीस जुन्या समाजरचनेंत पिळून निघणाऱ्या वर्गाकडून न होतां मध्यमवर्गाकडून झालें. आजहि नवीं मूल्यें समजण्याची पात्रता व तीं आचरणांत आणण्याचें धैर्य या वर्गापाशीं आहे, त्यामुळें तोच समाजक्रांति करूं शकेल असा मानवतावाद्यांचा दावा आहे. आतांपर्यंत निरनिराळ्या देशांत ज्या समाजवादी क्रान्त्या झाल्या त्यांनाहि ध्येयनिष्ठ मध्यमवर्गीय तरुणच कारणीभूत होते असें त्यांचें म्हणणें आहे. परंतु त्यांत फारसें तथ्य नाहीं. मूठभर मध्यमवर्गीय नेते कितीहि निष्ठावंत व कर्तबगार असले तरी हुकमी क्रान्ति करूं शकत नाहींत. पुढारी हे जनतेचे प्रतिनिधी व मार्गदर्शक असतात. सत्ताधारी लोकांच्या विरोधाला तोंड देण्याचें सामर्थ्य त्यांनीं जनतेंत निर्माण केल्याशिवाय त्यांच्या व्यक्तिगत मोठेपणामुळें कधींच क्रान्ति घडून येत नाहीं. मध्यमवर्गातील कांहीं युवक क्रांतिकारक तत्त्वज्ञान आत्मसात् करून कामगार-संघटनांशीं व्यक्तिशः समरस झाले असतील, कित्येकांनीं खूप हालअपेष्टाहि सोसल्या असतील; परंतु त्यांतील बहुसंख्य लोक प्रवाहपतित असल्यामुळें या वर्गाला क्रांतीचें श्रेय देतां येत नाहीं. सतराव्या किंवा अठराव्या शतकांतील युरोपीय समाजसंक्रमण मध्यमवर्गामुळें झालें ही गोष्ट मात्र खरी आहे. परंतु उदमी-कारागिरांचा त्या वेळचा महत्त्वाकांक्षी मध्यमवर्ग आणि आजचा नोकरपेशा बुद्धिजीवी मध्यमवर्ग यांच्या परिस्थितींत व मनोवृत्तींत जमीन-अस्मानाचें अंतर आहे. मध्ययुगाच्या अखेरीस पाश्चात्य देशांत नागरजीवनांतून जो मध्यमवर्ग उदयास आला, तो प्रथम सरंजामशाहीच्या लोखंडी बेड्यांतून स्वतः मुक्त झाला. एकीकडे जमीनदार व दुसरीकडे शेतकरी या दोघांनाहि कायदेशीरपणें लुबाडून त्यानें आपली शक्ति वाढविली. उत्पादनाचीं साधनें त्याच्या हातांत असल्यामुळें जुन्या समाजरचनेवर तो अवलंबून नव्हता. उलट, औद्योगिक प्रगतींत तिच्यामुळें अडथळे येतात याची त्याला जाणीव होती. त्यामुळें मिरासदारांना विरोध करून समाजाची नवी घडी बसविण्याचें कार्य त्यानें हातीं घेतलें. असें असूनहि ज्या ज्या वेळीं त्याला निकराचा संग्राम करणें भाग पडलें, त्या त्या वेळीं स्वतःपाशीं द्रव्यबळ असूनहि बहुसंख्य जनतेच्या संख्याबलाचें व प्रतिकारशक्तीचें त्याला साह्य घ्यावें लागलें. त्यांतूनच लोकशाहीची स्थापना झाली. स्वतंत्र कर्तृत्वाचा पुरस्कर्ता असलेला हा मध्यमवर्ग एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस स्पर्धेच्या धामधुमींत नाहींसा झाला आणि नवा पांढरपेशा मध्यमवर्ग ( new middle class ) अस्तित्वांत आला. त्यांतील बहुतेक सर्व लोक निर्वाहासाठीं जुन्या समाजरचनेवर अवलंबून आहेत. त्यांतहि वरिष्ठ मध्यमवर्ग बहुधा व्यापारी कारखानदारांशीं हातमिळवणी करतो आणि कनिष्ठ मध्यमवर्ग तर हळूहळू कामगारांपेक्षांहि निकृष्ट दशेला जात आहे. त्यामुळें या वर्गाजवळ द्रव्यबळ तर नाहींच पण स्वतंत्र बुद्धीहि नाहीं. यांतून जसे क्रांतिकारक तत्त्वज्ञानाचे प्रचारक निघाले तसे प्रतिगामी तत्त्वज्ञानाचे पाठीराखेहि निर्माण झाले. सामाजिक नीतिमत्तेच्या दृष्टीनें पाहिलें तरी भांडवलदार वर्गाची नीतीच या वर्गानें उचलली आहे. हिंदुस्थान व इतर देश यांमध्यें युद्धकाळीं जो काळा बाजार व लांचलुचपत फैलावली, तिला पुष्कळ अंशीं व्यापाऱ्यांच्या नफेबाजीइतकाच मध्यमवर्गाचा स्वार्थीपणाहि कारण आहे. छोटे व्यापारी किंवा कारखानदार यांनीं काळा बाजार करण्यांत मोठ्या भांडवलदारांचें अनुकरण केलें तर त्यांत कांहींच नवल नाहीं. परंतु डॉक्टर, वकील, प्राध्यापक, लेखक इत्यादि बुद्धिजीवि वर्ग घेतले तर त्यांच्यावरहि व्यापारी नीतीचा प्रभाव पडलेला आपणांस दिसून येतो. भांडवलदारी जगांत त्यांची विवेकबुद्धीहि बधिर झाली आहे. खाजगी आचरणांतहि पुरातन आदर्शच मध्यमवर्गीय तरुणांसमोर ठेवले जातात. त्यामुळें स्वैराचारास प्रवृत्त होणारे कांहीं थोडे अपवाद वगळले तर बहुतेक तरुणतरुणींचा जुने संस्कार व नव्या आकांक्षा यांच्या कैचींत कोंडमाराच होत असतो. अशा स्थितींत मध्यमवर्गानें इतरांहून आपण अधिक बुद्धिवादी व नीतिमान् आहोंत, असा टेंभा मिरविणें ही शुद्ध आत्मवंचनाच नव्हे का ? मध्यमवर्गानें ज्याप्रमाणें बुद्धिवाद सर्व ठिकाणीं अंगिकारला नाहीं त्याप्रमाणें सचोटी, निःस्पृहता व नीतिधैर्य यांचीहि त्यांनीं मक्तेदारी मिळविलेली नाहीं ! एकेका व्यक्तीला नीतिदृष्ट्या शुद्ध करून क्रांति करण्यासारखी








सध्यां परिस्थिति नाहीं. दोन विरोधी प्रवृत्तींच्या मागील बलाबलाचाच हा प्रश्न आहे.

### संघटनेची आवश्यकता

मानवतावाद्यांनीं आतां लोकशिक्षणाचें कार्य हातीं घेतलें आहे. व्यक्ति हाच नवसमाजरचनेच्या कार्याचा प्रारंभबिंदु आहे अशी त्यांची श्रद्धा आहे. म्हणून समाजधारणेसाठीं आवश्यक असणारे नैतिक गुण अंगीं बाणविणाऱ्या अधिकाधिक व्यक्ती तयार करण्याची त्यांची खटपट चालू आहे. लोकशिक्षणाच्या उपयुक्ततेविषयीं वादच नाहीं. लोकशाहीप्रधान समाजरचनेच्या यशस्वितेसाठीं जनतेमध्यें सतत जागृति करीत राहणें, हें एक अत्यंत महत्त्वाचें प्राथमिक कार्य आहे. परंतु सद्यःस्थितींत नुसत्या शिक्षणप्रसारानें व लोकजागृतीनें हा कार्यभाग साधण्याचा बिलकुल संभव नाहीं. जाति, धर्म, राष्ट्र अथवा वर्ग यांच्याबद्दलचा दुरभिमान ही एक मानसिक विकृति असल्यामुळें शिक्षणप्रसारानें ती नाहींशी होईल अशी मानवतावाद्यांची कल्पना दिसते; परंतु व्यक्तीच्या मनोव्यापारांची घडण प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणें परिस्थितींतूनच होत असते. म्हणून ही बाह्य परिस्थिति बदलल्याशिवाय नुसत्या विचारविनिमयानें ह्या विकृतीचें कधींच उच्चाटन होणार नाहीं. कांहीं गोष्टी बुद्धीला पटल्यानंतरहि प्रस्थापित हितसंबंधामुळें त्या अंमलांत आणणें दुरापास्त होतें. या ठिकाणीं केवळ सदिच्छावाद लंगडा पडतो. तेव्हां प्रतिगामी शक्तींना नामोहरम करण्याऱ्या प्रभावी संघटना स्थापन केल्याशिवाय समाजप्रगतीचें पाऊल कधीं पुढें पडत नाहीं. परंतु मानवतावाद्यांनीं तर हा संघटनेचा मुद्दा अजिबात डावलला आहे. इतकेंच नव्हे तर मानवतावादाच्या परिपूर्तीसाठीं त्यांनीं आपला पक्षहि विसर्जन करून टाकला आहे. परंतु एकाददुसऱ्या पक्षाच्या विसर्जनानें इतर संघटित शक्तींचा प्रभाव कसा कमी होणार ? परिस्थितिनिरपेक्ष मानवता ही एक अमूर्त कल्पनाच आहे. प्रत्यक्ष व्यवहारांत भोंवतालच्या सामाजिक उपाधींपासून अलिप्त असलेला मानव आपणांस कधीं आढळणार नाहीं. अंतर्मुख वृत्तीच्या विरक्त पुरुषालाहि दैनंदिन जीवनासाठीं निरनिराळ्या संस्थांच्या जाळ्यांत गुरफटावें लागते. आपलें आधुनिक जीवनच मुळीं सापेक्ष व संस्थात्मक आहे. कुटुंब, कारखाने, शासनसंस्था, व्यावसायिक संघ इत्यादि संस्था नाहींशा झाल्या तर आपला जीवनक्रमच स्थगित होईल. म्हणून व्यक्तिस्वातंत्र्याचा प्रश्न सोडवितांना संघटनेच्या कल्पनेवरच आघात करून चालणार नाहीं. समाजाच्या विकासाबरोबर या संस्थांचेंहि स्वरूप सारखें बदलत असतें. परंतु प्रचलित व्यवस्थेमुळें ज्यांना विशेष फायदा मिळतो, ते वर्ग या स्वाभाविक परिवर्तनाला नेहमींच विरोध करतात. म्हणून समाजाच्या पुनर्घटनेसाठीं नव्या मूल्यांचा आग्रह धरणाऱ्या सुसंघटित पक्षाची गरज असते. प्रतिगामी प्रवृत्तींना कसून विरोध करण्याची शक्ति जनतेंत निर्माण करणें हेंच या पुरोगामी पक्षाचें कार्य आहे. त्यासाठीं त्याला समाजजीवनांतील जुन्या वठलेल्या कल्पनांचे वृक्ष पाडून नव्या अंकुराची जोपासना करावी लागते. समाजक्रांतीसाठीं जरूर असणारी ही भूमिका ज्यांना भौतिक परिस्थितींतून क्रमप्राप्त झाली आहे, ते वर्गच अशा कार्यांत अग्रेसर होतात. या दृष्टीनें पाहतां आजचा मध्यमवर्ग ही कामगिरी जबाबदारीनें पार पाडण्यास समर्थ आहे असें वाटत नाहीं. कारण तो विस्कळीत असून त्यांतील निरनिराळ्या व्यक्तींचे हितसंबंध निरनिराळे आहेत. उलट कामगारवर्गाचे हितसंबंध बऱ्याच अंशीं एक असल्यामुळें तो या प्रतिगामी शक्तींना तोंड देऊं शकेल. त्याच्यापाशीं संख्याबळ आहे त्याचें दैनंदिन जीवनहि संघटनेस पोषक आहे. एकाच कारखान्यांत शेंकडों कामगार एकत्र काम करतात. उत्पादनकार्याशीं त्यांचा साक्षात् संबंध असल्यामुळें त्यांचा प्रतिकार हमखास प्रभावी ठरतो. म्हणून समाजवादी तत्त्वचिंतकांनीं या वर्गाच्या संघटनेवरच विशेष जोर दिला आहे. याचा अर्थ मध्यमवर्गाला क्रांतिकार्यांत अजिबात स्थान नाहीं असा नाहीं. कारण मध्यमवर्गीय दलितांबद्दल तुच्छता दाखवीत असले तरी धनिकांबद्दलहि त्यांना फारसें प्रेम नसतें. शिवाय या वर्गांत सुशिक्षितांचा भरणा जास्त असल्यामुळें तूर्त तरी त्यांतूनच समाजवादी तत्त्वज्ञानाचे प्रवक्ते व प्रचारक उत्पन्न होऊं शकतील-म्हणून एकांतिक व्यक्तिस्वातंत्र्याच्या व बुद्धिवादाच्या अवास्तव कल्पना सोडून देऊन मध्यमवर्गीय विचारवंतांनीं समाजवादाच्या दिशेनें लोकशिक्षणाचें कार्य चालू ठेवलें, तर तें समाजक्रांतीस खचित उपकारक होईल.








प्रा. स. वा. कोगेकर

# प्राध्यापक हॅरॉल्ड जे. लॅस्की : कांहीं आठवणी

राज्यशास्त्राचे गाढ व्यासंगी, तत्त्वज्ञ, व्यक्तिस्वातंत्र्य आणि सामाजिक न्यायाचें निष्ठावंत पुरस्कर्ते; ब्रिटिश मजूर पक्षाचे तात्त्विक मार्गदर्शक; हिंदी स्वराज्याचे विलायतेंतील एक वजनदार कैवारी; आणि गेलीं ३० वर्षें आपल्या प्रासादिक अध्यापनानें जगाच्या कानाकोंपऱ्यांतील हजारों विद्यार्थ्यांना 'लंडन स्कूल ऑफ इकनॉमिक्स'कडे खेंचून आणणारे आवडते प्राध्यापक हॅरॉल्ड जे. लॅस्की यांचा वयाच्या अवघ्या ५६ व्या वर्षी शुक्रवार, ता. २४ मार्च १९५० रोजीं अंत झाल्याची बातमी ऐकून सर्वत्र हळहळ वाटत असल्यास नवल नाहीं. निरनिराळ्या राजकीय वा सामाजिक चळवळींत प्राध्यापक लॅस्की यांनीं घेतलेला भाग आणि वयाच्या एकविसाव्या वर्षापासून तो शेवटपर्यंत झालेलें राज्यशास्त्रावरील त्यांचें लेखन या गोष्टी इतिहासांत नमूद झाल्या आहेत. राज्यशास्त्रांतील त्यांचे सिद्धान्त किंवा राजकीय घडामोडी व त्यांच्या कार्याचा झालेला परिणाम यांचें मूल्यमापन यथावकाश करण्यांत येईलच. त्यामुळें त्यांची थोरवी कदाचित् आजच्याहून अधिकहि ठरेल. परंतु ज्या व्यक्तीच्या हातून हें कार्य झालें तिच्या महान् व्यक्तिमत्त्वाची कल्पना तेवढ्यावरून कितपत यथार्थतेनें करतां येईल याची शंकाच आहे. आणि प्राध्यापकांच्या मृत्यूनंतर त्यांच्या असंख्य विद्यार्थ्यांच्या मनश्चक्षूंपुढें कोणती गोष्ट विशेष प्रामुख्यानें उभी राहात असेल तर ती म्हणजे त्यांचें व्यक्तिमत्त्व. त्या व्यक्तिमत्त्वाच्या आकर्षणानें भारावलेल्या विद्यार्थ्यांत चौदा वर्षांपूर्वी मीहि एक होतों.

इंग्रज माणसाच्या मानानें ठेंगणीशीच मूर्ति, निळ्या सर्जचा साधा सूट, तांबड्या रंगाचा टाय, कांहींशी दाबून बसविलेली मळकट फेल्ट हॅट, निळसर रंगाचा ओव्हरकोट, अशा वर्णनाचा चारचौघांसारखा दिसणारा पोक्त चेहऱ्याचा गृहस्थ झपझप पावलें टाकीत हॉबर्न स्टेशनकडून येतांना जर कोणी पाहिला असता तर त्रिखंड कीर्तीचा राज्यशास्त्रज्ञ म्हणून त्याला कोणीच ओळखला नसता. किंबहुना तसें सांगितल्यावर ऐकणाराची थोडी निराशाच झाली असती. पण प्रा. लॅस्की यांची विद्यार्थ्यांतील लोकप्रियता या बाह्यस्वरूपावर आधारलेली नव्हती. त्यांच्या व्याख्यानांतून, संभाषणांतून, लेखनांतून, गप्पांतून जो जिवंत ज्ञानाचा आणि निर्मळ अंतःकरणाचा आविष्कार दिसून येई, त्यामुळेंच विद्यार्थ्यांना त्यांच्याबद्दल विलक्षण आकर्षण वाटे. लंडन स्कूलमधील मोठ्या हॉलमध्यें साडेतीनशें—चारशें विद्यार्थी तन्मयतेनें त्यांचीं व्याख्यानें ऐकून घेत. एखादा नादिष्ट मुलगा झाडाच्या फांदीवर बसून आपल्याच विचारांत गुंगून रहावा त्याप्रमाणें प्राध्यापक महाशय उंच पाठीच्या खुर्चीवर किंचित मागें रेलून, डावा पाय खुर्चीच्या डाव्या हातावरून पलीकडे निष्काळजीपणानें सोडून, दोन्ही हातांच्या बोटांची गुंतागुंत करीत, आपल्या अमोघ वाणीनें राजकीय सिद्धान्तांचें विश्लेषण करूं लागले कीं वर्गांत कधीं प्रचंड हास्याचे फवारे उडत तर कधीं कमालीचें गांभीर्य पसरे. दृष्टान्तादाखल चालू घडामोडींवरचा उल्लेख करून त्यावर सूक्ष्मग्राही टीका करण्यांत त्यांचा हातखंडा

होता. त्याचबरोबर तात्त्विक चर्चेच्या मर्यादांचें अतिक्रमण न करण्याचीहि ते खबरदारी घेत.

पण वर्गांत द्यावयाचीं व्याख्यानें हा प्राध्यापकांच्या ज्ञानसत्रांतला सर्वांत कमी महत्त्वाचा भाग होता. स्वतःच्या अखंड व्यासंगानें विद्यार्थ्यांच्या डोळ्यांपुढें ज्ञानलालसेचें एक चालतेंबोलतें मॉडेल त्यांनीं ठेवलें होतें. या ना त्या निमित्तानें त्यांच्या खोलींत जाऊन त्यांची भेट घेणाऱ्या विद्यार्थ्यांस जो देखावा दिसे त्याचा त्यांच्या मनावर फार परिणाम होई. भुईपासून आढ्यापर्यंत सर्व बाजूंनी पुस्तकांच्या रांगा लागलेल्या त्या छोटेखानी खोलींत टेबलावरील पुस्तकांच्या राशीमागून हंसतमुखानें स्वागत करणारे प्राध्यापक तेथेंच उजव्या बाजूस बसलेल्या लघुलेखिकेला आपल्या आगामी ग्रंथांचा, लेखाचा वा परीक्षणांचा मजकूर सांगत असलेले कित्येक वेळां दिसत. त्या कामांत मध्येंच खंड पडला असला तरी विद्यार्थ्यांच्या अडचणी सहानुभूतीनें समजावून घेऊन एखादा उत्तेजनात्मक शब्द बोलल्याशिवाय ते रहात नसत. पुढेंच असणाऱ्या पुस्तकांतून एकादें पुस्तक उचलावें आणि तें वाचण्याची शिफारस करून पुस्तक घेऊन जा म्हणावें, असा अनुभव कित्येक वेळां येई. कित्येक वेळां पुस्तक वेळेवर परत न मिळाल्यामुळें प्राध्यापकमहाशयांना अडचणहि होत होती यांत शंका नाहीं. एकदां असेंच एक पुस्तक कोणा विद्यार्थ्यानें नेलें व कोणी नेलें त्याची अर्थातच प्राध्यापकांना आठवण राहिली नाहीं. पण त्यावर त्यांनीं केलेली उपाययोजना औरच! शेजारींच शेवटच्या वर्षांतलि विद्यार्थ्यांच्या सोयीसाठीं एक विभाग-वाचनालय होतें, त्याच्या सूचनाफलकावर एके दिवशीं अशी नोटीस लागली कीं 'अमुक अमुक पुस्तकाचा पहिला भाग ज्या विद्यार्थ्यानें मजकडून नेला आहे, त्यानें कृपा करून दुसराहि भाग घेऊन जावा, म्हणजे दोन्हीं भाग मला एकदमच विकत आणतां येतलि'!

शेवटच्या वर्षांतील राज्यशास्त्राच्या विद्यार्थ्यांचा प्रा. लॅस्की यांच्याशीं विशेष निकटचा संबंध येई. या विद्यार्थ्यांशीं गटागटानें दर पंधरवड्याला एक तास प्राध्यापक स्वत चर्चा करीत. ही चर्चा म्हणजे एक मोठी बौद्धिक मेजवानीच असे. प्राध्यापकांकडे नेहमीं भेटीस येणाऱ्या युरोप-अमेरिकेंतील पाहुण्यांनाहि कधीं कधीं या चर्चेच्या वेळीं बोलावण्यांत येई. दहा-बारा विद्यार्थ्यांच्या त्या मेळाव्यांत बरोबरीच्या नात्यानें वागून प्राध्यापकमहाशय विद्यार्थ्यांना सूक्ष्म विचारांचें प्रात्यक्षिक दाखवीत. तेथील पद्धतीप्रमाणें सिगारेटचे झुरके घेत घेत चाललेल्या या या चर्चेत कित्येक वेळां प्राध्यापकांच्या वैयक्तिक मतांचा किंवा जाहीर वक्तव्यांचा खल होई. अशाच एका चर्चेंत आपण राज्यशास्त्राकडे कसें वळलों, हें सांगतांना घरांत वडिलांशीं झालेल्या मतभेदांत वडिलांनीं आपणांस न पटणाऱ्या गोष्टी केवळ वडिलकीच्या अधिकारांत करावयास लावल्या व तेव्हांपासून 'सत्तेचा उगम आणि उद्देश' या विषयाकडे आपण आकर्षिले गेलों असें त्यांनीं सांगितलें. दुसऱ्या एका प्रसंगीं नेहमींपेक्षां थोडे आधींच प्राध्यापक म्हणाले: "मित्रहो, आज आपण येथेंच पुरें करूं." तेव्हां अर्थात् 'कशासाठीं' हा प्रश्न झालाच. त्यावर आदले दिवशीं रात्रीं घडलेला एक प्रसंग प्राध्यापकांनीं अशा मजेदार रीतीनें सांगितला कीं हसतां हसतां पुरे वाट झाली! तो प्रसंग म्हणजे मँचेस्टरला एक व्याख्यान देऊन रात्रीच्याच गाडीनें प्राध्यापक परत लंडनकडे येण्यास निघाले आणि निमंत्रकांच्या सौजन्यानें त्यांची पहिल्या वर्गाच्या झोंपण्याच्या डब्यांतून जाण्याचीहि सोय झाली; पण शेजारच्या जागेवर झोंपलेला माणूस इतका विलक्षण घोरणारा निघाला कीं आगगाडीच्या चाकांच्या घरघरीमधूनहि त्याचें घोरणें ऐकूं येई. अर्थात प्राध्यापकमहाशय तसेच तळमळत पडले. त्यामुळें घरीं लवकर जाऊन झोप घेण्याचा आपला विचार आहे असा खुलासा करून विद्यार्थ्यांची जिज्ञासा त्यांनीं पूर्ण केली.

राज्यशास्त्राचा अभ्यास हा केवळ वर्गांत अगर वाचनालयांत बसून होणार नाहीं असा प्रा. लॅस्की यांचा ठाम समज होता. ही गोष्ट त्यांच्या स्वतःच्या लेखनावरून व कार्यावरून सहज स्पष्ट होते. समाजांतील प्रत्यक्ष घटनांचा आणि विचारप्रवाहांचा निकटचा संबंध आहे. मनुष्याच्या अनुभवांतूनच





अनुक्रमणिका

त्याच्या गरजांचें **दर्शन होतें** आणि त्या गरजा पूर्ण करणें हें राज्यसंस्थांचें मुख्य उद्दिष्ट आहे, हीं त्यांच्या विचारसरणींतलि स्थायी सूत्रें असल्यामुळें विद्यार्थ्यांना प्रत्यक्ष राजकारण व राज्यशासन यांत भाग घेणाऱ्यांच्या सहवासांत आणावें असा ते प्रयत्न करीत असत. त्यासाठीं 'पॉलिटिक्स क्लब' या नांवाचें एक मंडळहि काढण्यांत आलें होतें. या मंडळाच्या बैठकीला पाहुणे म्हणून राजकारणी व राज्यशासनांत अधिकारी असणाऱ्या व्यक्तींना पाचारण करण्यांत येऊन मोकळेपणानें चर्चा घडवून आणण्यांत येई. विद्यार्थ्यांनीं वाटेल ते प्रश्न विचारावे पण सर्वच प्रश्नांचीं उत्तरें दिलींच पाहिजेत असा पाहुण्यांवर निर्बंध नसे. मंडळाच्या पहिल्याच बैठकीला ब्रिटिश कॅबिनेटचे सेवानिवृत्त चिटणीस डॉ. टॉम जोन्स यांना बोलावण्यांत आलें होतें व कॅबिनेटच्या कारभारासंबंधींची चर्चा फारच उद्बोधक झाली. अशा बैठकी साधारणतः रात्रीं ८ ला ठेवल्या जात आणि त्यापूर्वी ७ ला लंडन स्कूलच्या जेवणघरांत जेवणाची व्यवस्था असे. या जेवणाला प्रा. लॅस्की हजर रहात आणि मग गप्पागोष्टींना आणि हास्यविनोदाला पूर येई. अर्थात् बोलण्याचें काम प्राध्यापकांकडे आणि हंसण्याचें काम विद्यार्थ्यांकडे अशी कार्यविभागणी बहुतेक वेळां होई. या मंडळाच्या बैठकींना त्या वेळीं राज्यशास्त्रशाखेंत काम करणारे डॉ. फायनर, डॉ. एच्. बी. लीज-स्मिथ व डॉ. जेनिंग्ज हेहि हजर असत. पहिल्याच बैठकींत मंडळाचे उद्देश स्पष्ट करतांना प्राध्यापकांनीं अशी आशा व्यक्त केली कीं, पुढें मागें कॅबिनेटमधलि मंत्री, प्रीव्हि-कौन्सिलर्स, हायकोर्ट जज्ज यांनाहि आपण बोलावूं आणि त्यांना उलटसुलट प्रश्न विचारून हैराण करूं. डॉ. लीज-स्मिथ हे पहिल्या मजूर-मंत्रिमंडळाचे सदस्य व प्रीव्हि-कौन्सिलर होते. त्यांजकडे वळून प्राध्यापक म्हणाले: "आणि हें पाहा एच्. बी., तुम्हांला देखील आम्ही केव्हां तरी आरोपींच्या पिंजऱ्यांत उभें करूं हं! मग प्रीव्हि-कौन्सिलर आहांत म्हणून तुम्हांला कांहीं सबबी सांगतां येणार नाहींत!" डॉ. लीज्-स्मिथ वयानें प्रा. लॅस्कींपेक्षां किती तरी अधिक, पण त्या दोघांतील मैत्रीहि दाट; त्यामुळें इतक्या मोकळेपणानें विद्यार्थ्यांसमोरहि ते वागत. लीज्-स्मिथनीं जें उत्तर दिलें त्यामुळें विद्यार्थ्यांवर फारच परिणाम झाला. ते म्हणाले, "प्रोफेसर लॅस्की, मी इथं तुमच्यापुढं प्रीव्हीं कौन्सिलर म्हणून कधीं तरी वागलों आहे काय?" प्रा. लॅस्कींच्या हाताखालीं 'पार्ट टाईम लेक्चरर' म्हणून डॉ. लीज-स्मिथ शिकवीत होते.

प्रा. लॅस्कींचा प्रत्यक्ष राजकारणाशीं किती तरी निकटचा संबंध होता. त्यांत भर पाडण्यासारखी गोष्ट म्हणजे अमेरिकेचे त्या वेळचे अध्यक्ष प्रे. रूझवेल्ट यांची प्राध्यापकांशीं दाट मैत्री होती. मधून मधून प्रे. रूझवेल्ट यांचे पाहुणे म्हणून ते अमेरिकेंत त्यांच्याकडे जात होते. अशाच एका भेटीनंतर भरलेल्या चर्चावर्गात कांहीं निमित्तानें अमेरिकेसंबंधीं प्रश्न निघाला आणि मग प्राध्यापकांनीं तेथील निरनिराळ्या मतप्रवाहांच्या प्रत्यक्ष निरीक्षणानंतर आपलें बनलेलें मत इतक्या आकर्षक रीतीनें सांगितलें कीं तास केव्हां निघून गेला, समजलेंहि नाहीं. एखाद्या प्रसंगाचें वर्णन करतांना त्यांतील नाट्यात्मकता प्रकट करण्याची त्यांची हातोटी होती. प्रे. रूझवेल्टशीं झालेल्या मुलाखतींचें वर्णन करतांना तेथील वर्तुळाकृति खोली, तिचा निळा रंग, तेथील टेबल, त्यामागें बसलेले प्रेसिडेंट, प्राध्यापकांशीं झालेल्या एका चर्चेनंतर लगेच टेलिफोनवर त्यांनीं दिलेला आदेश, त्यावर झालेलें संभाषण वगैरे इतक्या तपशिलांत त्यांनीं विद्यार्थ्यांना नेलें कीं, जणूं काय तो प्रसंग आपल्या डोळ्यांपुढेंच घडत आहे असें वाटावें!

अमेरिकेंतील घडामोडींबरोबर रशियांतील घडामोडींकडेहि प्राध्यापकांचें बारकाईनें लक्ष होतें. रशियांत ते वारंवार जाऊं शकत नसत व ज्या ज्या वेळीं गेले त्या त्या वेळीं त्यांच्या तेथील वक्तव्याबद्दल इंग्लंडमधील उजव्या गटाकडून त्यांच्यावर विशेष कडक टीका झाली. परंतु तेथील आर्थिक नियोजनामुळें व विशेषतः नव्या स्टॅलिन-राज्यघटनेनंतर तेथील सामाजिक घडी स्थिरावत आहे असें मत ते पुढें मांडीत; तरी





अनुक्रमणिका

रशियाच्या प्रत्येक धोरणाचा अगर कृत्याचा पाठपुरावा त्यांनीं कधींच केला नाहीं. कार्ल राडेक प्रभृति पूर्वीच्या निष्ठावान् कम्युनिस्टांवर ज्या वेळीं राज्यद्रोहाचे आरोप ठेवण्यांत आले, त्या वेळीं झालेल्या चर्चा-वर्गांतलि वादाविवादांत त्यांच्या मनांत खूपच खळबळ व गोंधळ उडाल्याचें दिसून आलें. रशियाच्या एकंदरींत प्रगतिपर उन्नतिबद्दल सहानुभूति वाटत असूनहि तेथें प्रसंगीं घडून येणाऱ्या क्रूर हत्याकांडाचें समर्थन करण्यास ते सहसा धजावत नसत.

प्रा. लॅस्की यांच्या इतर दृष्टींनीं सर्वांगपरिपूर्ण अशा लेखनांतहि हाच परस्परविरोधी सूर दिसून येतो. त्याचें कारण त्यांच्या वैचारिक पूर्वपीठिकेंत कदाचित् सांपडूं शकेल. लिबरल विचारसरणीचा संस्कार त्यांच्या मनावर फार खोलवर झालेला होता. याच विचारसरणीचा प्रत्यक्ष अनुभवांत पडताळा पहात असतांना, शासनसंस्थेच्या सर्वंकष सत्तेचा धोका त्यांना जाणवला आणि म्हणूनच व्यक्तिस्वातंत्र्य आणि व्यक्तिविकास या गोष्टी आधारभूत धरून त्यांनीं सार्वभौमत्वाच्या सिद्धांताची बारकाईनें तपासणी केली. त्यांतून त्यांच्या अनेकतावादा(Pluralism)चा उदय झाला. शासनसंस्था हीच व्यक्तीवर अधिराज्य गाजविणारी एकमेव संस्था होऊं शकत नाहीं; किंबहुना कोणतीहि संस्था अशा प्रकारें व्यक्तीवर अधिराज्य गाजवूं शकत नाहीं कीं ज्यामुळें व्यक्ति-विकास अशक्य व्हावा. व्यक्तिविकासास उपयुक्त असेल तरच कोणतीहि संस्था अस्तित्वांत राहूं शकेल. समाजांतील मध्यवर्ती संस्था म्हणून शासनसंस्थेकडे जो अधिकार येतो तो जनतेच्या संमतीनेंच गाजविला गेला पाहिजे आणि त्यासाठीं जनतेला तो अधिकार योग्य प्रकारें गाजविला जातो हें पटलें पाहिजे. जनतेच्या आशा-आकांक्षा अनेकविध संस्थांतून प्रकट व सफल होत असल्यामुळें अशा संस्थांवर नियंत्रण घालण्याचें सरकारनें टाळलें पाहिजे. जर नियंत्रण आवश्यकच झालें तर तें व्यक्तिविकासाला पोषक आहे या कारणासाठींच आवश्यक असलें पाहिजे व तसें तें आहे किंवा नाहीं हें ठरविण्याचा अधिकार जनतेला असला पाहिजे. अशा रीतीच्या अनेकतावादांतून निर्मळ लोकशाहीचा पुरस्कार प्राध्यापक लॅस्की यांनीं केला.

परंतु अनेकतावादाच्या बुडाशीं असलेलें एक गृहीतमूल्य प्रत्यक्ष व्यवहारांत सांपडणें अशक्य दिसल्यामुळें आपल्या विचारप्रणालीची त्यांनीं फेरतपासणी केली. तें गृहीतमूल्य म्हणजे शासन-संस्थेची तटस्थता. ती त्यांना रशियाखेरीज अन्यत्र कोठेंच आढळली नाहीं. कारण जेथेंतेथें शासन-संस्थेचा उपयोग एका विशिष्ट अल्पसंख्य वर्गाच्या हितसंबंधांना उचलून धरण्यासाठीं केलेला आढळतो. अशा परिस्थितींत व्यक्ति-स्वातंत्र्य व व्यक्ति-विकास या कल्पना बहुसंख्य जनतेच्या बाबतींत तरी केवळ कागदीच ठरतात. जोंपर्यंत वर्गविग्रह चालू आहे तोंपर्यंत शासनसंस्था तटस्थ असूंच शकणार नाहीं; आणि तोंपर्यंत राजकीय लोकशाही म्हणजे धनिकशाहीवर घालावयाची एक आकर्षक झूलच ठरणार. अनेकतावादही अर्थातच तोंपर्यंत प्रत्यक्षांत येणें शक्य नाहीं. तेव्हां वर्गविग्रहांतून वर्गहीन समाज-व्यवस्थेप्रत जाणें ही प्रगतीच्या मार्गावरील पहिली पायरी समजली पाहिजे. म्हणून आपला अनेकता-वाद हा मार्क्सवादी विचारसरणीच्या मार्गावरील एक टप्पा होता असें त्यांना म्हणावें लागलें. गेल्या पंधरा वर्षांत तात्त्विक दृष्ट्या ते जरी जास्त जास्त मार्क्सवादी विचारसरणीकडे वळत असले तरी युद्ध, हत्या इत्यादि मार्गांनीं सामाजिक बदल घडवून आणला तर तो चिरकाल टिकणारा ठरेलच असा त्यांना भरंवसा नसावा. पूर्वीच्या उदारमतवादी परंपरेंत वाढलेल्या प्रत्येक बुद्धिवाद्यापुढें हीच समस्या उभी असलेली आपणांस दिसते. तींतून समाधानकारक मार्ग शोधून काढण्याच्या कामीं प्रा. लॅस्कींसारख्या चतुरस्र विचारवंतांचें मार्गदर्शन यापुढें होऊं शकणार नाहीं ही खरोखर दुर्दैवाची गोष्ट म्हटली पाहिजे. पण त्याहूनहि अधिक दुर्दैवाची गोष्ट म्हणजे ज्या सुस्वभावी, निरलस, चारित्र्यवान् आणि सहिष्णु पंडिताच्या व्यक्तिमत्त्वाचा संस्कार यापुढेंहि हजारों विद्यार्थ्यांच्या वर्धिष्णु विचार-संपदेवर झाला असता, त्या प्रा. लॅस्की यांच्या व्यक्ति-मत्त्वास आपण कायमचें मुकलों ही होय !

# सा र सं क ल न

## सर्वोदयाचें साधन आणि साधना

नाशिक येथें फेब्रुवारीमध्यें भरलेल्या शिबिराच्या द्वारें काँग्रेस कार्यकर्त्यांमध्यें सूत्रबद्धता, संघीय वृत्ति, आचारात्मक शिस्त आणि बंधुभाव निर्माण करण्याचा प्रयत्न झाला. शिबिराचा आढावा घेतांना श्री. शंकरराव देव यांनीं नाशिक येथें महाबळेश्वर येथील शिबिरांत (एप्रिल १९४९ मध्यें) घोषित केलेल्या साध्य-साधन-साधनेचें अधिक स्पष्टीकरण केलें. तें स्पष्टीकरण काँग्रेसच्या पुढील प्रगतीच्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. त्या स्पष्टीकरणाचा थोडक्यांत सारांश पुढें दिला आहे :

" सर्वोदय शब्दानें अहिंसक समाजरचनेचें ध्येय दाखविण्याचा हेतु आहे. हा अहिंसक समाज शोषणरहित, बंधनरहित असा समाज आहे. व्यक्तिगत संपूर्ण सहकार्य, घनिष्ठ असा बंधुभाव आणि राज्यसंस्थेची अनावश्यकता हें ह्या अहिंसक समाजाचें वैशिष्ट्य आहे. व्यक्तिगत व स्वयंभू अशा नैतिक कायद्यामध्यें, आत्मसंयमामध्यें आणि सदसद्विवेकबुद्धीच्या प्रेरणेमध्यें ह्या समाजाचें शासनसामर्थ्य आहे. सर्वोदय—समाजाचें हें लक्ष्य पुढें ठेवून, सध्यां ज्या समाजांत आपण राहतों त्या समाजाची आपणांस प्रगति करावयाची आहे. जेथें राज्यसंस्था विलीन होते अशा समाजाचें वर्णन कम्युनिस्ट करीत असतात. तेंच वर्णन ह्या सर्वोदय समाजास लागू पडतें.

" अशा प्रकारच्या सर्वोदयाच्या ध्येयाकडे जाण्याचें मुख्य साधन लोकशाही हें आहे. सर्व सुसंस्कृत राज्यसंस्था सांप्रत लोकशाहीवर आधारलेल्या आहेत. कांहीं राष्ट्रांत प्रौढ सार्वत्रिक मतदानानें निवडून दिलेल्या लोकसभेमध्यें ही लोकशाही (Parliamentary Democracy) आविर्भूत झालेली दिसून येते. कांहीं देशांत भांडवलप्रधान लोकशाही (Capitalistic Democracy) आहे. रशियामध्यें ह्या लोकशाहीनें मजूर आणि किसानांची हुकूमशाही (Dictatorship of the proletariat) हें स्वरूप धारण केलें आहे. पाश्चात्य देशांत गेल्या सुमारें ३०० वर्षांच्या राजकीय आंदोलनानें लोकशाहीची वाढ निरनिराळ्या तऱ्हेनें होत आहे. देशकालविशिष्ट निरनिराळीं रूपें हीं लोकशाही धारण करीत आहे.

" आपल्या देशांतहि आपणांस लोकशाहीचीच कांस धरून आपली राज्यसंस्था परिणत करावयाची आहे. विषम आर्थिक परिस्थितींत, आपल्या देशांत जी राज्यसंस्था निर्माण झाली आहे, ती लोकशाही असला तरी विषम आर्थिक परिस्थितिमुळें येणारे राज्यसंस्थेमधील दोष आपल्यास शक्य तितके कमी करावयाचे आहेत; आणि साम्यवाद्यांची वर्गविशिष्ट हुकूमशाही टाळण्यासाठींहि आपणांस कसोशीनें प्रयत्न करावयाचा आहे. मजूर-किसानांची हुकूमशाही ही देखील राज्यसंस्थेच्या वाढीच्या दृष्टीनें एक मधली अवस्था आहे आणि एकवर्गीय समाजाच्या अधिकाधिक उन्नत अशा लोकशाही-मध्यें ती परिणत करावयाची आहे असें साम्यवाद्यांचेंहि धोरण आहे. एकजिनसी आणि आर्थिक पातळीच्या दृष्टीनें समान भूमिकेवर स्थिर राहणाऱ्या एकवर्गीय समाजस्थापनेची पूर्वतयारी म्हणूनच आपल्या राज्यसंस्थेचें ते समर्थन करीत आहेत. एकवर्गीयसमाजस्थापनेसाठीं वर्गविग्रहाचा आणि अपरिहार्य अशा हिंसेचा आपण आश्रय तात्पुरता घेत आहों असें साम्यवाद्यांचेंहि निक्षून सांगणें आहे. शांतियुक्त, शोषण-





अनुक्रमणिका

रहित, एकजिनसी, वर्गविहीन समाज स्थापन करावा हें सर्वसंमत असें ध्येय आहे.

" प्रौढमतदानामुळें निवडून दिलेल्या लोकसभेच्या स्वरूपाची लोकशाही, भांडवलशाहीप्रधान लोकशाही, साम्यवादी लोकशाही ह्यांच्यातर्फे राज्यसंस्थेचें स्वरूप अधिकाधिक कार्यक्षम करण्याचा प्रयत्न सुसंस्कृत राष्ट्रांत चालू आहे. लोकसभेतून निर्माण झालेली राज्यसंस्था देशांतील निरनिराळ्या राजकीय पक्षांची संगति, विरोध किंवा समतोलन ह्या साधनांचा राज्यसंस्थेच्या कार्यक्षमतेसाठीं आणि विकासासाठीं उपयोग करून घेत आहे. भांडवलशाहीप्रधान राज्यसंस्थेमधलि दोष समाजसत्तायुक्त लोकशाही-( Socialistic Democracy )च्या किंवा समाजहितरत अशा लोकसत्ते-( welfare state )च्या मार्गानें कमी करण्याचा खटाटोप राजकारणी लोक करीत आहेत. साम्यवाद्यांचीहि लोकशाही परिस्थितिसापेक्ष असें परिवर्तन राज्यसंस्थेमध्यें घडवून आणीत आहे

"सर्वोदयी दृष्टिकोन ह्या सुसंस्कृत राष्ट्रांतील लोकशाहीपेक्षां पुष्कळ निराळा आहे. गांधीजींचा दृष्टिकोन सर्वस्वीं नैतिक व अहिंसामूलक आहे. साध्यसाधनांचा मिलाफ हा ह्या सर्वोदयी दृष्टिकोनाचा विशेष आहे. सार्वत्रिक प्रौढ मतदानावर आधारलेल्या लोकशाहीचें आजचें स्वरूप लक्षांत घेऊन त्या लोकशाहीच्या पायावर नैतिक लोकशाही आपणांस उभारावयाची आहे. इतर लोकशाह्यांप्रमाणेंच एका गटाची, संप्रदायाची, पक्षाची किंवा विशिष्ट राजकीय उपपत्तिमध्यें परिणत पावलेल्या फौजी संघटनेची, जनकल्याणाच्या हेतूनें का होईना आपणास कांस धरावयाची नाहीं; आपणांस गांधीजींनीं दाखविलेल्या रस्त्यानें जावयाचें आहे.

" आधुनिक सुसंस्कृत म्हणविणाऱ्या राजकीय युगांत आपल्यास नैतिक, अहिंसायुक्त व शोषणरहित लोकशाही स्थापन करावयाची आहे; एवढेंच नाहीं तर अशा लोकशाहीची गतिहि आपणांस शीघ्र करण्यावांचून तरणोपाय नाहीं. 'आस्ते कदम' हें जरी सार्वत्रिक मतदानाच्या निवडणुकीवर आधारलेल्या लोकशाहीचें स्वरूप सामान्यतः असतें, तरी प्रस्तुतची आणीबाणीची परिस्थिति लक्षांत घेऊन आपणांस क्रांतियुक्त भावनेनें आपली लोकशाही विकसित केली पाहिजे. गांधीजींचा वारसा गांधी पानें सिद्ध करण्याची जबाबदारी आपण ओळखणें जरूर आहे.

" वैयक्तिक सदसद्विवेकबुद्धि अधिकाधिक सूक्ष्म, तरल व तीव्र होण्यानेंच नैतिक लोकशाहीची शीघ्र वाढ होऊं शकते; त्याशिवाय नैतिक विकासाचा दुसरा उपाय नाहीं. ही वैयक्तिक सदसद्विवेकबुद्धि सुसंस्कृत व शुद्ध झाली पाहिजे. सदसद्विवेक बुद्धि 'सर्वभूतहिते रत' अशी बनल्याशिवाय तिला खरी संस्कारिता किंवा शुद्धता प्राप्त होऊं शकत नाहीं. सत्याग्रहाचें तेज अशा सुसंस्कारी सदसद्विवेकबुद्धींत किंवा चित्तशुद्धींत निर्माण होऊं शकतें. सत्याग्रहावांचून नैतिक लोकशाहीच्या गतीमध्यें शीघ्रता निर्माण होऊं शकत नाहीं. नैतिक लोकशाहीची स्थापना करावयास सदसद्विवेक बुद्धीची गरज आहे; आणि सदसद्विवेकबुद्धि अधिकाधिक कार्यक्षम करावयास सत्याग्रहाची जरूरी आहे. ह्या वैयक्तिक तरल, सूक्ष्म आणि तीव्र अशा सदसद्विवेकबुद्धींतून 'सर्वभूतहिते रत' अशी सामूहिक इच्छाशक्ति (collective will) निर्माण होऊं शकते आणि ही सदसद्विवेकबुद्धींतून निर्माण झालेली सामूहिक शक्ति अहिंसायुक्त नैतिक लोकशाही स्थापण्यास समर्थ होते.

" चित्त शुद्ध करावयास किंवा सदसद्विवेकबुद्धींत खरी संस्कारिता निर्माण करावयास निःस्वार्थ सेवावृत्ति अंगीं बाणून घेतली पाहिजे. ही सेवावृत्ति म्हणजेच खरें विधायक कार्य होय.

"सर्वोदयाचें किंवा अहिंसक समाजरचनेचें ध्येय पुढें ठेवून नैतिक लोकशाहीची स्थापना करावयाची असल्यास चित्तशुद्धीची, सेवावृत्तीची किंवा रचनात्मक कार्याची कांस धरल्याशिवाय गत्यंतर नाहीं. ह्या लोकशाहीची गति शीघ्र करणें सांप्रत अत्यंत जरूरीचें असें कर्तव्य आहे; आणि सत्याग्रहानेंच ही शीघ्रता निर्माण होऊं शकते."

रचनात्मक कार्यावर काँग्रेस कार्यकर्त्यांनीं सांप्रत कां जोर दिला पाहिजे, अथवा काँग्रेसची नवी घटना बदलविण्याचें रहस्य काय आहे, हें अशा प्रकारें श्री. शंकरराव देव यांनीं विशद केलें. काँग्रेस कार्य-

कर्त्यांनीं आपल्या वैयक्तिक आचार-विचारांत किंवा उपरिनिर्दिष्ट सामाजिक साध्य-साधन-साधनेमध्यें शुचिता निर्माण केली पाहिजे, हें त्यांच्या स्पष्टीकरणाचें सार आहे. सर्वोदय, लोकशाही आणि रचनात्मक कार्य ह्या तीन प्रकारच्या समाजोन्नतीच्या श्रेणींमध्यें पद्धतशीर विचारसरणीची सांखळी त्यांनीं निर्माण केली आहे.

—ह. कृ. मोहनी

## हायड्रोजन बॉंब

अमेरिकेच्या अध्यक्षांनीं हायड्रोजन-बॉंबला सुरुवात करण्याचा हुकूम दिल्यामुळें सर्व जगभर जें निराशेचें वातावरण पसरलें आहे तें अनिवार्य आहे असें माननारांहि एक पक्ष आहे. अमेरिकेतर्फे जी 'बरूक योजना' पुढें मांडण्यांत आली होती ती रशियानें डावलली आणि आंतरराष्ट्रीय अणुशक्तिनियंत्रणासंबंधींची शक्यता या अडेलतट्टू धोरणामुळें नाहींशी झाल्यामुळें अमेरिकेला पुढचें पाऊल टाकावें लागलें, असें त्या पक्षाचें म्हणणें आहे. त्यांना अशी भीति वाटत आहे कीं आतांहि रशियाजवळ केवळ पूर्वीचा अणुबॉम्बच नव्हे तर हायड्रोजन बॉम्बची तयारीहि असावी. कारण ज्या तत्त्वावर तो तयार व्हावयाचा तें तत्त्व आज अनेक वर्षें माहीत झालेलें आहे; या खास अणुविषयक क्षेत्रांत काम करणाऱ्या तज्ज्ञ शास्त्रज्ञांत रशियाच्या प्रो. कॅपिट्झाची गणना होते. आणि हा शास्त्रज्ञ गेलें युद्ध संपतांच केंब्रिजहून रशियांत गेला असून त्यानंतर त्याला अपूर्व शास्त्रीय संशोधनाबद्दल स्तालिन पारितोषिकहि देण्यांत आलें आहे.

हायड्रोजन बॉम्बच्या मौलिक रहस्याच्या बुडाशीं हायड्रोजन या मूलतत्त्वाच्या अणूंचें हेलियम या मूलतत्त्वांत रूपांतर करण्याबद्दलचा सिद्धांत आहे. या रूपांतरासाठीं तात्कालिक अणुस्फोटानें उत्पन्न होणारी शक्तीच पाहिजे असते. तेव्हां प्रथम अणुबॉम्बची निर्मिति झाल्यावर मगच हायड्रोजन बॉम्बची निर्मिति शक्य होती; कारण अणुबॉम्बच्या प्राथमिक स्फोटानंतर हायड्रोजनच्या अणूंचा हेलियम बनून मग त्याचा स्फोट होण्याची दुय्यम स्फोटक्रिया त्यांत असते. रशियाला अणुबॉम्ब साध्य झाल्यामुळें आतां अमेरिकेचें अणुशास्त्राबाबतचें अद्वितीय स्थान डळमळलें. तेव्हां या शर्यतींत मुख्य भाग घेणाऱ्या अमेरिकेला पुढील पाऊल टाकण्यावांचून गत्यंतर नव्हतें.

रशियाला जर "प्राथमिक" (**ordinary**) अणुबॉम्ब (म्हणजे युरेनिअम् किंवा प्लूटोनिअमच्या अणूचा बॉम्ब) हस्तगत झाला असेल, तर त्यापुढें जाऊन रशियाला हायड्रोजन बॉम्ब तयार करणेंहि साध्य होईल, कारण त्याला **'detonator'** (स्फोटक) म्हणून लागणारा अणुबॉम्ब तयार आहेच. मग मात्र अमेरिका या भयानक अस्त्रांच्या शर्यतींत मागें पडेल ही भीति स्वाभाविक आहे. म्हणून रशियाला मागें टाकण्यासाठीं हायड्रोजन बॉम्बला सुरुवात करण्याची ही घाई.

अणुशक्तिनियंत्रणासाठीं अमेरिकेकडून मांडली गेलेली बरुक-योजना किती सदोष व संशयास्पद आहे तें प्रो. ब्लॅकेटसारख्या तज्ज्ञांनीं दाखवून दिलेंच आहे. परंतु त्याऐवजीं दुसरी योजना पुढें आलेली नाहीं. 'बरुक'-योजना म्हणजे कांहीं वेदवाक्य नव्हे हें खरें, पण रशियाकडून त्याला होत असलेला विरोध आणि कोणत्याहि अन्य योजनेचा अभाव यांमुळें पश्चिमी राष्ट्रें रशियाच्या हाय खाऊन आहेत आणि म्हणून केवळ 'धमकीचें राजकारण' (**war of nerves**) आतां शिल्लक राहिलें आहे—व ज्याच्याजवळ अधिक भयानक शस्त्रें तें अधिक भयानक राष्ट्र, असें समीकरण चालू राजकारणांत असल्यामुळें ही अणुस्फोटक शस्त्रांची शर्यत अपरिहार्य बनली आहे.

आतां या शर्यतीला थोपवून धरण्याची कांहींशी शक्ति जर कोठें असेल तर ती वैज्ञानिक आणि प्रायोगिक क्षेत्रांतच आहे, आंतरराष्ट्रीय राजकारणांत नव्हे, असें कांहीं विचारवंत मानतात. अजून हायड्रोजन बॉम्ब अस्तित्वांत आला नाहीं. (निदान कोणाला माहीत तरी नाहीं!) निमसरकारी अंदाजाप्रमाणें तो तयार व्हावयास अजून दोन वर्षें तरी लागतील. तेव्हांहि त्याचा लगेचच युद्धांतील मारक साधन म्हणून उपयोग करतां येईल असें नाहीं. या हायड्रोजन बॉम्बचा आकार व त्याची गुंतागुंतीची साधनसामग्री अतिशय अवजड होणार असा बराचसा संभव आहे व सध्या तयार असलेल्या








कोठल्याहि लष्करी विमानाला तो वाहून नेतां येणार नाहीं; मग रॉकेट किंवा इतर साधनांची गोष्टच सोडा. नुसता अणुबॉम्ब वाहून नेण्यासाठीं फक्त प्रचंड आकाराचें 'हवाई किल्ले'च कामास येऊं शकले, मग त्याच्या आजूबाजुला जो हायड्रोजन बॉम्ब तयार होणार त्यासह सर्व वजन उचलून न्यायला आजच्या कोणत्याहि लष्करी विमानाचा उपयोग नाहीं हें स्पष्टच आहे. म्हणून हायड्रोजन बॉम्ब तयार होऊन तो मोक्याच्या जागेवर नेऊन त्याचा स्फोट अचूक घडवून आणण्याएवढी परिस्थिति प्राप्त होण्यास अजून पांच-दहा वर्षें तरी लागतीलच. पण तोंवर हवाई हल्ल्यापासून संरक्षण करण्याच्या युक्त्या अमलांत येणें कांहीं थांबणार नाहीं. स्वयंचलित अग्निबाणांच्या साधनांमुळें आपोआप अडथळे उत्पन्न करण्याचें तत्त्व साध्य झाल्यामुळें, हवाई हल्ल्याची हायड्रोजन बॉम्बमुळें वाढणारी भयानकता पराकाष्ठेला पोंचण्याआधीं कदाचित्, हैड्रोजन बॉंबला शहहि देतां येईल, अशी पश्चिमी लोकशाही राष्ट्रांतील विवेकी माणसांची मानसिक प्रतिक्रिया आहे.

## प्रो. आइन्स्टीन यांचा इशारा

प्रेसिडेंट ट्रुमननें हायड्रोजन बॉंब तयार करण्यासाठीं हुकूम दिल्यापासून विचारी जगतावर निराशेचे ढग पसरत आहेत. ही जगद्विध्वंसी शस्त्रास्त्रांची शर्यत अखेरीस सबंध मानवी संस्कृति जाळून भस्म करील अशी भीति उत्पन्न झाली आहे. आज केवळ स्वसंरक्षणासाठीं आम्ही हा बॉंब तयार करीत आहोंत असें सांगण्यांत येत आहे. परंतु अशा तऱ्हेची भयानक चढाओढ शेवटीं आक्रमक युद्धांत परिणत होते असें गेल्या दोन महायुद्धांचा इतिहास सांगतो. आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत अणुशक्तीच्या नियंत्रणाबाबत कोणतीहि योजना घडविली जाणें अशक्य झालें आहे. या संस्कृतिनाशक स्पर्धेबद्दल प्रो. आइन्स्टीन यांनीं सावधगिरीची सूचना पूर्वी एकदां दिली होती. आतां पुन्हां नुकतीच प्रो. आइन्स्टीन यांनीं भयसूचना दिली आहे. या विश्वविख्यात शास्त्रज्ञाचे पुढील विवेकाचे बोल तरी भ्रान्त जगाच्या विचारशक्तीला स्पर्श करोत !

"ही हायड्रोजन बॉम्बची निर्मिति सत्य सृष्टींत आली तर सबंध वातावरण रेडिओ-ॲक्टिव्ह द्रव्यानें विषमय करून टाकण्याची आणि त्यायोगें सर्व जीवमात्राच्या संहाराची कल्पना शास्त्राच्या कक्षेंत येईल. या घटनेचें भस्मासुरी स्वरूप तिच्या उघड उघड अनिवार्य स्वरूपांत सामावलेलें आहे. यांतील प्रत्येक पाऊल मागच्या घटनेचा अपरिहार्य परिणाम आहे. अखेरीस सर्वनाश मात्र लिहिलेला दिसतो.

"जोंवर एखादी गोष्ट भविष्यकालीन युध्दाकडे डोळे लावूनच अंमलांत आणली जात आहे तोंवर शांततेची शक्यता फार कमी आहे. शस्त्र-सिध्दतेच्या द्वारें सुरक्षिततेची आशा करणें हा एक मोठा भ्रम असून त्यामुळें अंतीं विनाश ठेवलेला आहे.

"आजची सर्वांत मोठी आवश्यकता परस्परांबद्दलची भीति व अविश्वास नाहींसा करणें ही आहे. श्रद्धापूर्वक सर्व हिंसेचा त्याग–केवळ मोठ्या प्रमाणावर प्राणहानि करणाऱ्या शस्त्रास्त्रांचाच नव्हे–अत्यंत अवश्य आहे यांत संदेह नाहीं. आणि अशा तऱ्हेचा हिंसात्याग सुपरिणामी व्हावा म्हणून राष्ट्रातीत स्वरूपाची, न्यायदानाचा व त्याची अंमलबजावणी करण्याचा अधिकार असलेली संस्था निर्माण झाली पाहिजे व राष्ट्रांच्या सुरक्षिततेचे ताबडतोबीचे प्रश्न कोणते तें ठरविण्याचा अधिकार तिच्याकडे सोंपविला पाहिजे.

"अशा तऱ्हेची नियंत्रित विश्वराष्ट्रसत्तेची योजना करावयास आपण निष्ठापूर्वक तयार असल्याबद्दलची घोषणा सर्व राष्ट्रांनीं केली तरीहि युद्धाचें नजीकचें भय बरेचसें दूर होईल."

## 'चितासमं नास्ति शरीरशोषणम्'

अमेरिकेंतील विस्कॉन्सीन् विद्यापीठाच्या रेडिओ स्टेशनवरून तेथील मन्रो चिकित्सालयाचे मुख्य डॉक्टर जॉन अ. शिन्ड्लर यांनीं "युवर माइन्ड कॅन् कीप यू वेल" या विषयावर एक प्रवचन केलें, त्याचा सारांश "रीडर्स डायजेस्ट" च्या











डिसेंबर (१९४९) च्या अंकांत आला आहे. मनाचें स्वास्थ्य हें शरीरस्वास्थ्याला अत्यंत जरूरीचें आहे हें सर्वांना माहीत आहेच; पण आधुनिक काळांत मनाचें सूक्ष्म संशोधन होऊन निश्चित मानस-शारीरिक विकृति कळून आल्यामुळें त्यांवर काय उपाय योजावेत तेंहि आतां बरेंचसें बिनचूकपणें सांगतां येतें. डॉ. शिन्ड्लर यांनी अशाच एका सर्वसाधारण आढळणाऱ्या मनोव्याधीवरील कांहीं आटोक्यांतील इलाज सुचविले आहेत व ते माणसाला स्वतःला करतां येण्यासारखे आहेत. म्हणून त्यांचें विशेष महत्त्व आहे. डॉ. शिन्डलर म्हणतात :

" मी त्या मनोव्याधीचें नांव सांगण्याची टाळाटाळ करतों आहे याचें कारण असें कीं, तें कळतांच तुमच्या मनांत कित्येक चुकीच्या कल्पना उत्पन्न होतील. पहिली ही असेल कीं, हा रोगच नाहीं. पूर्वी याला ' सायकोन्यूरॉसिस् ' ( मनोमज्जातंतुव्याधि ) म्हणत. आतां तोच ' सायकोसोमॅटिक ' ' मानस-शारीरिक आजार ' म्हणून ओळखला जातो.

" हा ' सायकोसोमॅटिक ' आजार कोणा बिनविषारी किंवा विषारी जंतूंमुळें किंवा नव्या वाढीमुळें होत नाहीं. तो आपल्या दररोजच्या जीवनांतील परिस्थितींतून निर्माण होतो. त्या परिस्थितीच्या वर्णनासाठीं मी तीन शब्द पसंत केले आहेत : ' चिंता ', ' अडचणी ', ' आपत्ति ' ( cares, difficulties, troubles ). या चिं. अ. आ. च्या जाड आवरणामुळें ज्याला आनंद व सुखाच्या वातावरणांत प्रसंगोपात्तहि जातां येत नाहीं त्याला हा रोग होतो.

" कांहीं मनोविकारांचा-उदा० क्रोध, मनाचा गोंधळ, अनिश्चय इत्यादींचा-शरीरावर तात्काळ परिणाम होतो. अशा विकारांमुळें स्नायू दृढ बनतात. प्रथम मानेमागचे स्नायू ताठर बनतात. दुसरा स्नायूंचा समूह ( oesophagus )-अन्नमार्गाच्या वरच्या टोंकाजवळचा-असाच ताठर होतो; अन्न-मार्गाच्या खालचे स्नायू यांत गुंतले तर अधिक गंभीर प्रकार होतो. बहुधा पोटांतील स्नायू आंतल्या बाजूला दाब आणतात व स्नायू खूप दाबले गेले तर मग त्यामुळें एखाद्या व्रणग्रंथी-( ulcer )-सारखी इजा पोंचते. मस्तकशूल असलेल्या लोकांपैकीं बरेचसे लोक याच मनोरोगानें पीडलेले असतात. कवटीच्या आंतील किंवा बाहेरील रक्तवाहिनी मज्जातंतूंच्या उद्दीपनानें इतकी पिळून निघते कीं त्यामुळें पीडा होऊं लागते. त्याचप्रमाणें ' डर्मेटॉलॉजिस्ट ' (त्वग्रोगतज्ज्ञ) ज्या त्वचारोगांवर उपाय योजतात त्यांपैकीं सर्व त्वचारोग काळजी, चिंता किळस वगैरेमुळें होतात.

"मज्जातंतूंवरील ताणाची नेहमींची जागा म्हणजे ( थोरॅक्स ) छातींतील डाव्याबाजूच्या वरचे स्नायू. छातीवरील उजव्या बाजूला दुखूं लागलें तर कांहीं विशेष वाटत नाहीं ! पण डाव्या बाजूला दुखूं लागलें, तर हृदय-विकाराची शंका येते. असे लोक त्याकडेच सारखें लक्ष देतात आणि केवळ या लक्ष देण्यामुळेंच हें दुखणें सुरू होतें.

" स्नायूंच्या ताणाप्रमाणेंच व ' एन्डोक्राइन नांवाच्या अंतःस्रावी ग्रंथिसंस्थेवर विकारांचा परिणाम हेंहि या ' सायकोसोमॅटिक ' आजाराचें कारण असतें.

" यावर कांहीं सूचना मी करूं इच्छितों : (१) सारखें कांहीं बिघाड होतो कीं काय म्हणून चिंतेला आमंत्रण देत राहूं नका, (२) काम करण्याची आवड निर्माण करा, (३) एखादा छंद लावून घ्या, (४) लोकांविषयीं आवड अंगीं बाणवा; माणूसघाणेपणा टाका, (५) परिस्थिति आटोक्यांत नसेल तर आहे त्यांत समाधान मानण्यास शिका, (६) विपत्तींचा स्वीकार करा, त्यासाठीं तयारी ठेवा, (७) गंमतीच्या, विनोदी गोष्टी बोलत राहण्यास शिका आणि शेवटीं (८) आपल्यापुढील प्रश्नांचा निकाल दृढनिश्चयानें करावयास शिका.

" या नेहमींच्या दुखण्यांतून वांचावें म्हणून वाटत असेल तर वरील गोष्टी तुम्ही शिकणें जरूर आहे. याची गुरुकिल्ली म्हणजे मनाचा निश्चय : ' मी माझी वृत्ति व विचार शक्य तेवढी आनंदी, व उत्साही ठेवणार. ' सुखाची यापेक्षां चांगली व्याख्या सांपडणें कठीण. "





अनुक्रमणिका